# 'मधुपर्क'

पुरुषोत्तम मंगेश लाड

केशव भिकाजी ढवळे,
श्रीसमर्थ-सदन,
गिरगांव, मुंबई.

# प्रस्तावना

युद्धाच्या सध्यांच्या परिस्थितींत व स्वतःच्या वयाच्या अडातिसाव्या वर्षी कवितांचा हा पहिला संग्रह रसिकांना सादर करतांना थोडेंसें आत्मवृत्त सांगणें क्रमप्राप्त आहे असें मला वाटतें. कवि म्हणजे खासगत भावनांचा पसारा बाजारांत मांडणारा एक पिसा असा त्याचा लौकिक असतोच. तेव्हां आत्मवृत्त-पर भाग प्रस्तावनेंत घालतांना मला निराळा संकोच वाटावयास नको. मागें एक संग्रह मीं तो "बालिश" वाटला म्हणून फाडून टाकला. तथापि काव्याचें व्यसन कांहीं सुटलें नाहीं. मात्र परिस्थितीमुळें काव्य हा आयुष्यांतील प्रधान उद्योग होऊं शकला नाहीं. रोजगाराच्या कामापुढें कविता ही साहजिकच रिकामपणाची कामगिरी झाली. ज्या महाराष्ट्री कविराजाचा मी पुढें निबंधांत वारंवार उल्लेख केला आहे त्या राजशेखरानें सांगितल्याप्रमाणें मी एक केवळ "दत्तावसर" कवि झालों. तशांत माझ्या बुद्धींत चंचल मधुकर-वृत्तीचा दोष असल्यामुळें काव्याला आणखी कमी अवसर मिळूं लागला. असें असतांसुद्धां प्रसंगवशात् स्फुट कविता लिहून झाली. तेवढ्यावरच थांबतें तर हा यौवनाचा विकार कालांतरानें आपोआप बरा होईल म्हणून मीं दुर्लक्ष केलें असतें; व प्रसिद्धीच्या भानगडींत खचित पडलों नसतों. पण हळूहळू काव्यामार्फतच आपले विचार मांडावे ही प्रवृत्ति बळावूं लागली; व त्या दिशेनें प्रयत्न नकळत होऊं लागले. तेव्हां माझी सध्यांतरी अशी खात्री झाली आहे कीं हा दम्यासारखा दुःसाध्य काव्यरोग मला कायमचा जडला असावा. संधि मिळतांच हा बळावणार. दरम्यान् मित्रांनीं कविता पाहिल्या. कांहीं टोपण नांवांखालीं दोनतीन मासिकांत प्रसिद्ध केल्या. कैलासवासी माधवराव पटवर्धनांचा आग्रह पडला कीं वेंचक स्फुट कविता अवश्य प्रसिद्ध कराव्यात. पुढें १९३७ सालीं विलायतेंत कायद्याचा अभ्यास करण्यास गेलों तेव्हां कविता निवडून फुरसदींत संग्रह तयार केला; व तो माधवरावांकडे पाठविला. त्या उदारमनाच्या ज्येष्ठ कवीनें हस्तलिखित काळजी-पूर्वक वाचून, प्रत्येक कवितेवरील आपले शोध व अभिप्राय लिहून, विलंब न

लावतां चोपडी परत रवाना केली. तांब्यांना संग्रह अर्पण करावयाचा असें कळवितांच त्यांचीही परवानगी मिळून दिली. इतकें झाल्यानंतर १९३९ सालीं हिंदुस्थानास परत आल्यावर प्रकाशन ताबडतोब करावयास पाहिजे होतें. पण मनाचा निश्चय होईना. कामढकल्या स्वभावामुळें प्रकाशन सारखें लांबणीवरच पडत चाललें. माधवरावांच्या मृत्यूनंतर प्रकाशकांशीं करार केला. तरीही आणखी एक वर्ष लोटलें. अखेर राजशेखराचा शहाणपणा संपूर्णपणें पटण्याचा काळ येऊन ठेपला. "पुनः समापयिष्यामि, पुनः संस्करिष्यामि, सुहृद्भिः सह विवेचयिष्यामि, इति कर्तुराकुलता राष्ट्रोपप्लवश्च[1] प्रबन्धविनाशकारणानि." शेवटीं एकदांच्या कविता छापखान्याच्या स्वाधीन केल्या. इतक्यांत तांब्यांच्या मृत्यूची दुःखद वार्ता आली. ज्यांचा हात धरून या काव्यसंसारांत शिरत होतों ते दोनही सोयरे सोडून गेले. पण आतां प्रकाशकांनीं थोडेंच थांबूं दिलें असतें ? त्यांच्या तगाद्यामुळेंच प्रकाशन इतक्या लवकर होत आहे. ज्या वयांत बरेच कवि काव्याकडे पाठमोरे होतात त्या वयांत कवि म्हणूनच लोकांसमोर प्रथम येण्याचें धाडस मी करीत आहें. व तेंही पूर्वेकडे बळावलेल्या युद्धाच्या काळीं! पुस्तकास वापरलेल्या कागदावर देखील पीतोपप्लवाची छाया पडलीच! कविता लिहून झाल्यानंतर कांहीं वर्षें तरी ती प्रसिद्ध करूं नये हा सत्कवींचा शिरस्ता येणेंप्रमाणें मजकडून अनायासें पाळला गेला. ह्या निर्बंधाचा हेतुच हा, कीं वात्सल्याचा पहिला उमाळा ओसरल्यानंतर बाळाचें करवंटेपण पिताश्री कवींना आपोआप कळून चुकेल. पण शेवटपर्यंत माझा बाळ गुणीच असें वाटणाऱ्या प्रेमांध पित्याच्या कोटींतला मी कदाचित् असेन. जुनें मद्य केवळ कालक्रमानें मुरलें म्हणजे अधिक मधुर लागतें, व निशा लवकरच चढते. पण तसें होण्यास आधीं मूळची भट्टी नीट उतरावी लागते. काळाची मीं भरपूर मदत घेतली आहे. पण भट्टी ठीक उतरली आहे किंवा नाहीं हें ठरविणें रसिकांचें काम आहे. त्याची चिंता मी आतां कशास करूं ?

मात्र एक गौण चिंता कधींतरी मला उगीच जाचते. कवि आणि न्यायाधीश या दोन मुखवट्यांतील बदल चाणाक्ष रसिकाप्रमाणें सामान्य वाचकासही कळेल

---

१. उपप्लव = अशांतता, स्वारी.

कीं नाहीं ? वास्तविक श्री. आ. रा. देशपांडे यांचा दाखला समोर असतांना मला ही निरर्थक भीति वाटावयास नको. आणि आमच्या न्यायखात्याचे लोकनियुक्त मंत्रीच मुळीं कादंबरीकार नव्हते का ? इंग्लंडच्या अपील कोर्टांतून अलीकडेच सेवानिवृत्त झालेले लॉर्ड जस्टिस् स्लेसर यांनींही कविता प्रसिद्ध केल्या आहेत. शेक्सपिअरचे ग्रंथ बेकननें लिहिले असें कांहीं लोक प्रतिपादितात; यावरूनच न्यायाधीश महाकविसुद्धां असूं शकतो ही कल्पना सामान्य दिसते. उघडच आहे, कीं दोघेही शब्दांना राबवून घेतात ! तेव्हां कवि म्हणून कीर्ति कमावण्यापेक्षां न्यायाधीश म्हणून मी प्रतिष्ठा गमावून बसेन ही भीति सर्वस्वीं निराधार आहे असें मी मनाचें समाधान करून घेत असतों. कविता व प्रेम करावयाला सबब लागत नाहीं हें रसिकांस सांगणें नलगे.

आतां या संग्रहाचा चार शब्दांत परिचय करून दिला पाहिजे. कविता स्वतंत्र आहेत. भाषांतरें मीं बाजूला काढून ठेवलीं आहेत. पुढें मागें गोळा करतां येतील. कविता रचनेच्या कालक्रमानें मांडल्या आहेत इतकें सांगितलें म्हणजे पुरे. त्या केव्हां, कुठें, कशा लिहिल्या, असल्या खासगी चौकश्या समंजस वाचक सामान्यतः करणार नाहींत. वृत्तांचीं नांवें खुद्द माधवरावांनींच घातलीं आहेत. जीं अनामक राहिलीं तीं माझ्या स्वतःच्या नवीन प्रयोगांत जमा धरावींत. कवितांत क्वचित् कोंकणी शब्दप्रयोग सहज पण सहेतुक आले आहेत. ते सर्व शब्द शिष्टसंमत मराठींत रूढ व्हावेत अशी माझी इच्छा आहे. वाचतांना फुलीच्या चिह्नानें बिचकून जाऊं नये. त्या ठिकाणीं टीप असल्याची ती सूचना आहे. इच्छा असल्यास शेवटीं जोडलेल्या टीपांत तें स्थळ पाहावें. उपयुक्त माहिती कदाचित् मिळेल. टीपांची मदत अर्थ उकलून दाखविण्याकरितां क्वचित् घ्यावी लागली यावरून नारिकेलपाकापलीकडे या कोंकण्याची करामत गेली नाहीं हें कबूल केलें पाहिजे. शेवटीं जोडलेला निबंध बुद्ध्याच लिहिला आहे. गुलाबाला बहार आणण्याकरितां मधून मधून त्याचीं मुळें उकरून त्यांस सूर्यप्रकाश मिळेल अशी व्यवस्था करावी लागते. त्याचप्रमाणें काव्य फुलविण्याकरितां मूलभूत सिद्धांतांची फिरून चर्चा करून नवा प्रकाश मिळतो कीं काय हें बघण्याचा मोह अनेक कवींना आवरतां आला नाहीं. या निबंधांत "यथा मम" हा जगन्नाथरायाचा दर्प नाहीं याची

आगाऊच ग्वाही देतों. पद्यापेक्षां गद्य हें लांबावयाचेंच; तेव्हां पद्य मूठभर व गद्य हातभर झालें तर त्यांत आश्चर्य नाहीं.

असो. शेवटीं रत्नाकर, लोकशिक्षण व साहित्यपत्रिका या मासिकांत प्रसिद्ध झालेल्या कांहीं कवितांचा या संग्रहांत समावेश केला आहे त्याबद्दल त्यांच्या ऋणाचा उल्लेख केला पाहिजे. ऑल-इंडिआ-रेडिओतर्फे झालेल्या एका भाषणाचा उपयोग निबंधांत करण्याची परवानगी दिली यास्तव मी रेडिओच्या चालकांचा आभारी आहें.

पु. मं. लाड

मुंबई, ८ मे, १९४३

# अनुक्रमणिका

*

# कवि भास्कर रामचंद्र तांबे यांस अर्पण

[ जाति : पादाकुलक

अर्पी कविता कवे तुला
तुझ्या यशाला नसे तुला ॥ ध्रु. ॥

*भर्तृहरीचा तुझा वारसा
जीवनापुढें धरिसि आरसा
प्रेम—मृत्युच्या जासि पारसा
हंससी कधिं या क्षुद्र जंतुला.

लाजविलें त्वां साच परीसा
महिमा न दुजा याच्या परिसा
तांब्याची हो जन हो ! परिसा
सुवर्णाहुनी अधिक कीं तुला !

त्वां गरुडासम घट आणियले
बिंदु बिंदु पित रितेच केले
कवी नवे बहुजिह्वचि झाले
अमर आणखी—धरिं न किंतुला.

खेद न मानीं जरि दिन ढळतो
एकहि चेला कां नाढळतो ?—
संध्याछाया जो उजळीतो
जणों बिजेची ती चन्द्रकला.

[ १

कालिदासें बघ महाकाला
मालविं पूर्वी दिवा लाविला
तो लवमात्र कमी कां झाला ?
सांग कधीं कां तो मालवला ?

पैलतिरीं जरि दृष्टि लागली
स्मृती वसों दे मनीं चांगली—
वात जरा ती त्वां सारियली
ज्योत जागविल दोन्ही कूलां.

# पिसें

[ वृत्त : शार्दूलविक्रीडित

साऱ्या सृष्टिवरी हळूहळु चढे गुंगी निशेची पुरी—
मेघांचे नभिं हे थवे थबकती, स्वच्छंद-मंदा गती
सोडोनी अपुली, जणूं स्थिर खडीं शीडें समुद्रावरी.
स्वप्नें दिव्य बघोनि गोड हंसती निद्रिस्त बाळें जशीं,
खुद्‌कन् तेविं हळूच मुग्ध मधुनी या चांदण्या हांसती.
धिंगाणा विसरोनि सर्व दिनिंचा वारा दमोनी निजे;
ऐकूं येति निजेंतले मधुनिही सुस्कार त्याचे परी.
चित्तीं वावरती जशा गतकथा, अस्पष्ट तैसे तरू
पानांवीण सुन्या सुन्या पसरुनी शाखा उभे खिन्न हे—
अंधारीं जणु धूसर स्फुरतसे गेली वसंतस्मृति.
थांबे तांडव, आदळोनि हटल्या लाटा किनाऱ्यावरी—
एवी जीव शिणे सदा झगडतां आयुष्य बंधांसवें—

ऐसें शांत जरी समस्त जग हें माझ्यासभोंतीं असे
मातें शांति परी मुळीं नच मिळे—लागे मला कां पिसें ?

# भिकारी

[ जाति : पतितपावन

बघुनी सुंदर दृश्यें, ऐकुनि मोहक वा गीतें
स्वस्थ चित्त परि पर्युत्सुक तें कोणतें न होतें ?
सुरम्य सुंदर, भयाण भीषण, सृष्टीचीं चरितें
सारखेंच मम चित्त हुरहुरे बघुनी दोघांतें.
कविकुलगुरुला नकळे येती कैशा स्मृति चित्तीं—
जन्मांतरिंची स्थिरभावाची प्रगटे कां प्रीती ?
ध्यास लागतो कसला तरि या हृदया हें सत्य
सुखी जिवाला उदास वाटे उगाच कां नित्य ?

*                    *                    *

सागरलहरींवरी झळकती चंद्राचीं किरणें,
हिरवळ–निळसर पाण्यावरती चकाकती रत्नें.
शुभ्र रौप्यरस मुरडत नाचत तळपत जणुं धांवे
अशा प्रभांच्या प्रेम–मीलनीं विलीन मी व्हावें.
सोसाट्याचा तुफान वारा घुमतो बेफाम,
साथ तयाला तसलिच द्यावी हाच मनीं काम.
वेडे ऐसे मनिंचे होती काय पुरे हेत ?
व्यर्थ चुटपुटे निरास मन हें उदासीन होत.

*                    *                    *

सृष्टीच्या कीं चैतन्याचा सारा हा खेळ
कधीं तयाचा सौंदर्याशीं मधुर जमे मेळ.
स्फुरते त्याची हृदयिं कुठेशी छाया तात्काळ
नकळत झांकी जडतेचा तिज हळूच शेवाळ.
कधीं घालिते तीच चेतना भैरव थैमान
त्या शक्तीचें दुमदुमतें मनिं भीषण आह्वान.
नसांनसांतुनि सळसळते मग तीच शक्ति दिव्य
दुबळ्या देहीं विरतें—मरतें—विकट तिचें काव्य.

*   *   *

त्या शक्तीचा, चैतन्याचा मीच वतनदार
अपुल्या दारीं मीच भिकारी !—रीतच ही न्यार !

# पावसाचें अंगाईगीत

[ छंद : अंजनी

नीज रे बाळा
खेळाची ही नोहे वेळ
नीज रे बाळा.

आज बाळा पावसानें
दिलें दिसे ठाम ठाणें
दीस सुना खेळाविणें
जाई वेल्हाळा.

गेलीं किरणें लपुन
वर्णीं कथिल मलिन
ऐसे झांकोळती घन
पूर्ण आभाळा.

माउलीची बाळावर
जेविं मायेची पाखर
वृष्टि तेविं झिरमिर
चाले या काळा.

पावळ्यांची सळसळ
वाटे थांबे पळ पळ,
कानीं घोळे, नसे खळ
मुळीं तिजला.

पाखरांची बहुसाल
शांतलीसे किलबिल
केविं एकला वाजेल
तुझा बा वाळा ?

बाळा पडेल ओखळ
पैल त्या आंब्यावरिल
सादें सारखी बाहील
तुला कोकिळा.

आभाळाच्या फटींतून
ऊन हळू निसटून
मोतियें पानांवरून
करील गोळा.

आई पावसाचें गीत
गाई अंगाई उचित
बाळा हळु निज येत
सांडिला चाळा.

# विनवणी

[ जाति : केशवकरणी

आज साजणी तुजवांचोनी रात जात बघ सुनी—
करूं तव किति गे मनधरणी !

फुकाच हेका धरुनि सुखातें मुकशी कां मानिनी ?
घडी ही येइल कां फिरुनी ?

सांग जाइची कलिका कधिं का रुसली वाऱ्यावर ?
म्हणे मी नाहीं फुलणार !

रात भराभर पहा ओसरे विरहि चांदणें झुरे—
भरूं तूं नको ग मानभरें.

तरूतळवटीं करूं जिवलगे प्रेमाच्या गुजगोष्टी.
होसि कां सांग उगी कष्टी ?

आम्हांभोंतीं नीहाराचें झुलेल पटल कीं इष्ट :
जगाची पापि नको दृष्ट.

भीड कुणाची असे प्रीतिच्या निर्भिड एकांतांत ?
सखे तूं चल गे कुंजांत !

# बाला

[ वृत्त : शार्दूलविक्रीडित

बाला हें अभिधान केवळ तुला साजे, न अन्या कुणा;
बालेच्या स्वरुपें स्वयें नटलिसे सौंदर्यदेवी दिसे.
भोळे शुद्ध तुझे अनागस कुणा डोळे न हे मोहिती?
साध्या वस्तुंत कोणतें गवसतें आश्चर्य त्यां अद्भुत?
लीलामन्थर जे सदा दिसति, ते प्रोत्फुल्ल कौतूहलें
होतां नेत्र, कसा प्रहर्ष खुलतो,—कीं शोध लागे नवा.
तें अव्याजमनोहर स्मित तुझें दुःखासही हांसवी
चाळे मुग्ध खुळे लतेसहि मदें हे डोलवीती तुझे;
जेव्हां चालसि तूं तदा ठुमकतें ठाके जणों नृत्य कीं!
स्वाभावीकच हावभाव सगळे अत्यंत निर्हेतुक
चित्ता गुंतविती विशेष परि ते–हें गूढ गे कौतुक.
पापी चित्तहि होतसे तुज पुढें निष्पाप निष्काम कां?

आनंदी नवचेतनापुतळिका जी आज ही नाचते
ती राहील अशीच कां पुढति?—ही चिंता उगी जाचते.

# रातराणी

[ वृत्त : मिश्र उपजाति

गेली निशा दिवस हा दुसरा उजाडे
निस्तेज मंदप्रभ या उजेडें
कोंदाटला खिन्न दिसे निवास—
हा रातिंचा दरवळे परि कां सुवास ?

रातीं विजेची लहरी लकेर
वर्षानभीं चमकली स्मितभेर सैर
आतां सुना दुर्दिन हा उदास—
हा रातिंचा दरवळे परि कां सुवास ?

डोळे तिचे लोल विशाळ काळे
गेले तयांचे भुलवोनि चाळे
लागे सकाळीं चटका जिवास—
कां रातिंचा दरवळे अझुनी सुवास ?

ती मोहिनी रजनिची अझुनी न गेली
काळेंहि गुंगी अझुनी न नेली
मागें तिचे विविध राहति ते विलास
हा रातिंचा दरवळे म्हणुनी सुवास.

# मेघदूताचें समवृत्त भाषांतर करणाऱ्या
# 'सुभग' कवीस

[ वृत्त : मन्दाक्रान्ता

"मेघीं" लीलारतिं कवि करी भारतीशीं विलास
तो देखोनी इतर कविंचीं होत चित्तें उदास
होई त्यांना उपरति पुरी त्यागिती वाग्रतीतें
गर्वें तुम्हीं 'सुभग' म्हणुनी पावलां दुर्गतीतें !

गंधर्वांची निजगति जिथें कुंठते, नाच चाले
गीतस्फूर्ती सुचवित तिथें गर्दभांनाच चाळे
टीकाकारा ! तुकविं रसिका ! आपुली लांब मान
मानीना मी परि तव खरीं मानपत्रें प्रमाण.

"*श्रोणीभारें अलसगमना नम्र पीनस्तनांनीं"
मन्दाक्रान्ता बघुनि विधि ती आपणा धन्य मानी;
ऱ्हस्वीं दीर्घीं तशि यतिपदीं मोडली ठायिं-ठायीं;
कुब्जा वाटे दुसरि तव ही वांकली सात ठायीं !

मन्दाक्रान्ता सुरइ मधुची आणिते रत्नताटीं
ओताया ती परि बघ तिथें ठेविली त्वां नरोटी.
काव्याची जो मधुर मदिरा अर्पिण्या होत "साकी"
"*कृष्णाची" तो प्रथम ललिता राखितो कंठिं साकी.

# जुनी मैत्री व नवी मोहिनी

[ वृत्त : प्रमाणिका

वळून मागुतें सखे !
बघूं नकोस सारखें
न बांधिं गे मनोरथां
प्रयास हे तुझे वृथा.

न मी जरी तपोनिधी
—भुलेल चित्त हें कधीं—
कटाक्ष हा परी वृथा
मला न जिंकि सर्वथा.

विशाल लोल लोचनीं
पडे कुणा न मोहिनी
भुले न कोण या रुपा ?
तुझी तशांत गे कृपा !

बघें परी वळून मी
जुन्याच मैत्रिला नमीं
वसे मनांत भामिनी
जिवास तीच या धनी

तिचाच जीव जाहला
तिलाच भाव वाहिला.
म्हणून तूं न मोहिलें
सुखें कटाक्ष साहिले.

तिनेंच चित्त राखिलें
तुला न चोरण्या मिळे
कटाक्ष रक्षिता कसे
हरीति सांग राजसे ?

# चार मंगलाष्टकें

[ वृत्त : आर्या

१

केवळ योगायोगें झाला संयोग दोन जीवांचा
परकी अनोळखी हीं संशय कोणा परी न यायाचा.

आश्चर्यें वदती जन " यांना धन होत थोर हर्षाची
दिसते जुनीच मैत्री खात्रीनें ही अनेक वर्षांची.

अथवा रूपगुणांवर गेलीं भाळून एकमेकां हीं "
खूण खरी अंतरिंची जाणूं आम्ही, कळे न यां कांहीं.

सुचवी कोणी जोशी गुण बत्तिस कीं पुरे पुरे जमती
तारामैत्रक यांचें विचित्र, चाले मुळीं न येथ मती !

झाली असे चुकामुक काळाच्या थोर वाळवंटांत
वाटे तेंव्हांपासुन होतों वाटेंत याच शोधांत.

यात्रा विजोड कंठी वाटसरू एकटा दिशा भुलली
अगणित वर्षें गेलीं, विस्मरणाची स्मृतीहि मावळली.

झाली भेट अचानक, अवचित भिडलीस थेट येऊन
बावरलें क्षणभर मन, घुटमळलें तुज फिरून पाहून.

नलगे मग सांगावें सांगातिण मागुती पहा आली
बिलगें तुला जिवलगे ! अलग न होई कदापि या पाळीं.

* * *

## २

आषाढप्रशमदिनीं प्रथम सखे ! भेट आपुली झाली
उत्कंठित कांतेच्या आलासे पांथ अंतिं हा जवळी.

वर्षाऋतु आला मग वर्षाच्या तो नवीन हर्षाचा
जीवनहर्षाचा जणुं दिसतो आदर्श सृष्टिचा साचा.

आला महिना श्रावण, करिती पावन जयासि सर्व सण
शुभ दिन त्याचे आले, विसांवले तैं क्षणैक कृष्ण घन.

अनुकूळ सर्वथा ती सहल करायास वेळ ओखळिची
शीतळ संध्याकाळीं जाईच्या धवल उमलत्या कळिंची.

जाऊं नित्य फिराया दूर सराया जनांहुनी परतें
विजनीं दुजेपणाला विसराया तेविं सर्वथा पुरतें.

तीं तोरणें लतांचीं, भरलेले जलनिधी—असा थाट
मंगल निसर्ग मांडी, प्रेमाचे शिकविण्या जणों पाठ.

उगवत गवत सभोंवति, अंकुरतो भूमि–जोम कीं प्रबळ
हिरवळ गर्वें मिरवे, चमकति जलबिंदु त्यावरी तरळ.

गीमांत खडे उघडे वागति जे साग, जेविं बैरागी
खोवुनि शिरीं तुरे ते, आज उभे नवरदेवसे मार्गीं.

* * *

## ३

तेथ पुलाला लागुन झाडी घनदाट दाटली निबिड
रचिली वृक्षलतांनीं प्रेममठीसाठिं पर्णकुटि सुघड.

झुळझुळतो तळिं ओहळ, शांती तल्लीन होउनी डोले
निश्चळ परिसति पानें, पवनहि गानें भुलोन ना हाले.

सांजेच्या काळोखीं ओळख देण्यास काजवे स्फुरती
तुझिया साडीवरच्या जरिखडिची त्यां नये परी सर ती.

प्रेममठीच्या द्वारीं बसत असूं त्या पुलावरी आम्ही
काम किं करो प्रसादा आशेची ह्या उचंबळे ऊर्मी.

धडधडतें हृदय, उरीं प्राण अपेक्षेंत याच एकवटे
भाव परी बाहेरी प्रगट न व्हावा म्हणून देह झटे.

लोकांत रोखुनी मज बघुनी दृष्टी सदा न जी घाली
ह्या एकांतीं कां ती नवोढ कांतेपरी वळे खालीं ?

घालिति हातरुमाला कुशाळ अंगुळी चुण्या सफाईनें;
धीटाई आटपली, ठाव दिला दृष्टिला धरित्रीनें.

सर्वांस बोलघेवडि मंजुळ बोलून वेड जी लावी
विजनीं एकाएकीं साळुंकी ती मुकी कशी व्हावी ?

* * *

## ४

गेले क्षण कांहीं मग, लक्षण त्यांचें दिसे विलक्षणसें
शिक्षण नलगे, गूढें मूढ जाणिती जणों विचक्षणसे !

भूमीला खिळलेली दृष्टि तुझी ती करावया वरती
दाखविं मी नक्षत्रें, दक्ष राखणी सदाच जी करिती.

भूमीचें स्वर्गाचें जडतें नातें अखंड कां स्नेहीं ?
मूळ असे आभाळीं, धूळिस मिळती जरी फळें कांहीं !

दाखविला ध्रुवतारा ज्यास्तव भगवान् स्वयेंचि अवतरला
निर्वाणींची निष्ठा ज्याची तो भक्त कोण ना तरला ?

*पत्नींना ध्रुव दाविति सदैव सप्तर्षि, सात्त्विक प्रीती
आश्रमिं कमी न होई, विरस जराही जरा करीना ती.

तो ध्रुव अढळ बघाया वळलिस, आलिस हळूच तूं जवळी
वलयांकित हस्ताची सहज अंगुळी तयाकडे वळली.

आवाज कांकणांचा होतां दचकून पक्षि मग उठती
होतिस तूंहि असावध, फडफड तुज सावधान परि करिती.

अंतर्पाट तमाचा फिटला, देहास देह मग भेटे
विरमे मंगल अष्टक, शब्दांचा व्याप येथ सर्व मिटे !

# आशा

काव्याची
नवी नवाळी फुलते
सुवास दरवळणार कधीं ?
जगता गुंगविणार कधीं ?

चितारितों
निशा–उषांनीं चित्रें
रूपा तीं येणार कधीं ?
लोकां दिपवीणार कधीं ?

मेळविले
सूर सर्व वाऱ्याचे
प्रगट गीत होणार कधीं ?
विश्वा डोलविणार कधीं ?

नव्यानव्या
मनीं कल्पना रुजती
पीक थोर येणार कधीं ?
कोठारें भरणार कधीं ?

अनंत हे
तरंग चित्तीं स्फुरती
तीरा ते जाणार कधीं ?
स्फूर्ती घोषविणार कधीं ?

# मरणोन्मुखाचे विचार

[ जाति : उद्धव

काबाडकष्ट दिवसाचे
संपलेच आतां सारे.
हे इष्ट–अनिष्ट पसारे
आटोपति आतां साचे !

कष्ट ते अनिष्ट न होती
इष्ट वा पसारे मजला
तुष्टला, जीव परि सजला
गुंगला तयांच्या भोंतीं.

अवचित परि संध्या आली
देवळांत नौबत झडली
मग वात दिव्यांतहि पडली
काळरात उजळी झाली !

कुणि देति मरण या नांव
" निजधाम " कुणी त्या म्हणती
कुणि म्हणती आली नाव
बंदरांत शेखीं—अंतीं.

नकळेच मला हें कांहीं
कळण्याची इच्छा मुळिं ना !
आलिया त्याग—भोगांना
सादर मी असतों पाहीं.

* * *

कधिं पीक अकाळीं सडतें—
—कापणीस नित्यचि येतें—
नवनवें नित्य उगवे तें
दृष्टि कां न त्यावर पडते ?

उन्मळुनी पडती वृक्ष
सारखें तेथ कां लक्ष ?
बीजांतुनि उगवे दुसरा
विस्तार वडाचा पसरा !

कोमेजति नाजुक जाई
लक्ष कां त्यांकडे जाई ?
फुलति जे केवडे रानीं
कुंद वा—मनीं ते आणीं !

जरि कुठें असेल सहारा
खरखिनें मूर्च्छे वारा
तरि सरवी चेरापुंजी
जलदांची तुटकी पुंजी !

मृत्यूचीं भेसुर चित्रें
काढुनी भिववितां कां हो ?
चैतन्या गा गा स्तोत्रें
त्यांचाहि असों द्या लाहो !

# संक्रमण

[ जाति : मोहमाया

आज संक्रांतिच्या । सुप्रभातीं प्रभो
करुण भूपाळि ही । आळवीं मी ॥

*          *          *

रोप तें प्रीतिचें । थोर फोफावलें
चित्त आसावलें । जोम बघुनी ॥

शिशिरिंचा गारठा । कडक पडला परी
करपुनी सर्व परि । नाश झाला ॥

क्षेत्रिं त्या रे पुन्हा । स्फुरत नव चेतना
संक्रमण–योजना । केलि तू ही ॥

उगवत्या अंकुरा । या वसंतीं रवी
ऊब देवो नवी । प्रार्थिं हें मी ॥

*          *          *

दीर्घतम पसरतां । घोरतमसा निशा
अंधकारें दिशा । अंध झाल्या ॥

त्या निराशा–तमीं । मार्ग नच सांपडे
जीव तो धडपडे । चांचपडतां ॥

काळरातींचि ती । वेळ टळली दिसे
ज्योति नव होतसे । भासमान ॥

दिवस त्या ज्योतिचे । पुढति नित वाढुं दे
जीवना उजळुं दे । प्रार्थि हें मी ॥

*        *        *

मूठमाती जिथें । पूर्व आशां दिली
त्या यमाच्या दिशे । पाठ फिरली ॥

अमर वसती जिथें । तेथ वळलों त्वरें
उत्तरायण खरें । आज लागे ॥

स्वर्गिच्या अर्गळा । गळुनि पडल्या स्वयें
दावितां त्वां सये । देवयान ॥

तेथुनी मागुता । मी कधींही न ये
विफळ होऊं नये । प्रार्थना ही ॥

# पाकळ्या

[ जाति : वल्लभा

येई मला मृत्यू जरी—येणार तो शंका नसे !—
येवो तरी तुजसारिखा इच्छा गुलाबा ! ही असे.
या पाकळ्या सगळ्या तुझ्या कळल्याविना गळल्या पहा
धूळींत आतां लोळती—क्रम सृष्टीचा चालेच हा.

व्यक्तित्व—देठापासुनी मम पाकळ्या प्रकृतीचिया
पडुं दे सुट्या, होवो स्वयें आकाररूपा लोप या.
झडले तुझे बा केसर पडले परागहि त्यां सवें
मिसळोत सारे मातिंत खेळोत वा वाऱ्यासवें.

माझ्या अहंकाराचिये नि:शेष केसर सारखे
खरुं दे, स्वयें चैतन्यही विखरूं कुठेंही तें सुखें.
जग भोंवतें दिसतें, अम्हां तें विश्व,—जरि आकुंचित—
हें दों दिसांचें आमुचें जाणार जीवित निश्चित.

विश्वांत त्या तुजसारिखा पळ एक परिमळ नांदुं दे
आल्हादवो इतरां जनां त्यांचीं मनें आनंदुं दे.
फांद्यांवरी फुलती कळ्या जवळी दुज्या कवळ्या परी
अमरत्व देती त्या, प्रथा चाले सनातन यापरी.

# बाहुली

[ वृत्त : देवप्रिया ( शिथिल )

सृष्टिला ना खेळण्याला पाहिजे ही बाहुली
फुलें तारे मिळुनि सारे पुतळि त्यांनीं निर्मिली.

जाइजुइच्या पाकळ्यांची सजविली नाजूक काया
पारिजातें देंठिं मग ती निगडिलीसे पुष्पमाया.

कांतुनी काळोख काळे-भोर केलें कुंतलां
कृष्णपक्षीं उगवणाऱ्या चंद्रबिंबाच्या कला
म्हणति आम्हां स्थान द्यावें छटा पिंग्री घ्यावि केशीं
*सर्व हरवूं गर्व, मिरवी व्यर्थ आकाशीं सुकेशी !

तेज गुरुचें मिसळिली कीं मंगळाची त्यांत लाली
पुसट देतां त्या उषेचा वोप कांती ही मिळाली.

वर्ण देखोनी सुवर्ण ऽ—केतकी कीं कंटकीं
रानिं दडती, चांफि पडती दर्प सोडोनी फिकीं.

निसर्गाच्या संगिताची धून दिसते शरिरिणी
खूण पटुनी विविध भावां साथ देते तत्क्षणीं.

मुलां ऐसी खुल्या रंगें फुलांसंगें कधीं दंगे
ढगांचे वा ढंग नाना पाहतांना कधीं गुंगे.

# उषा

[ जाति : भवतरी

लाजुं नको, लाजुं नको गाच तूं उषा ! ॥ ध्रु. ॥

तूं लबाड दिससि चोर
सासुसासऱ्यां समोर
मर्यादाशील जणों वागशी स्नुषा.

ओढुनियां चंद्रबळा
आणिशि परि, तोंडवळा
गोड तुझा निमिषमात्र टिकविना मिषा.

वाणि वदे जरि नकार
आतुर आंतून फार
घेतां माघार नार सुचवि विजिगिषा !

पुढति अम्हां कृष्ण निशा
घेरिल कीं चारि दिशा
उगवत्याच ज्योतिचि तूं कोंवळी उषा

मावळतीकडुन प्राण
उगवतिच्या पाशिं आण,
गानें क्षण भुलविं भान पुरविं मनीषा !

# दिवाळसण

[ जाति : विनोद

येणार तूं म्हणोनी
आनंद थोर झाला ॥ ध्रु. ॥

होई कधीं दिवाळी
भेटें कधीं सकाळीं
बाहूंत घट्ट कवळीं
झालें असें जिवाला.

रमझान संपुनीया
होई कधीं द्वितीया
टपुनी बसें बघाया
त्या चांदउत्सवाला.

जगिं दंपती अनेक
सुचतो तयां विवेक
हा ओसरेल देख
पहिला पुढें उमाळा.

त्यांना न दोष लावा
सांगा नदी–तलावां
जलधी कसा कळावा ?
ती कल्पना न त्यांला !

तूं मी सुपर्ण दोन
फिरतों सवें उडोन
होई वियोग सहन
कधिं या न सारसांला

# काव्याचा निवापांजालि

[ वृत्त : शार्दूलविक्रीडित

काव्याचा उदयास्त खुद्द कविही होतो कसा नाकळी.
कोणाची कविता कशी मरतसे हें तों कळेना मुळीं.
कांहींची कविता जिवन्मृतचि ये जन्मास; वर्षाघनीं
तारा जों दिसती न वा दिसति तों झांकोळती तत्क्षणीं.

लावोनी घटकाभरीच चटका लोपे बिजेचा शशी
मागें ठेवित अंधकार कविता कांहींजणांची तशी.
होई गुप्त सरस्वती मरुभुमी संसारिची लागतां
होतें काव्य खरें इथेंच, न पटे कोणास हें सांगतां

वारी ताप अशी मिळे सुखमयी जैं जीवनीं सांवली
वाढीची कविता समूळ खुडुनी नाशा न कां पावली ?
डोळ्यां देखत सोडुनीच कविता माझी मला चालली
वाराया असमर्थ मी तिजसि हा अर्पीं निवापांजली.

# प्रेमाची उत्तर-मीमांसा

[ जाति : पादाकुलक

प्रकृति खरी तूं पुरुष खरा मी
इतर कल्पना दिसती नामी
केवळ कविंच्या येतिल कामीं
प्रकृति खरी तूं पुरुष खरा मी ॥ ध्रु. ॥

आदिपुरुष तो होतां राजी
आदिस्त्रीच्या विलोभनें, जी
स्फुरे प्रेरणा, होते ताजी
तीच आज गे ! पुरुष तोच मी.

भरती येते नित्य सागरा
मृगीं कोसळे मेघ झरारा—
स्फूर्ती पुराण ही अनिवारा
उपमा अपुल्या दुर्दम जोमीं !

वावटळिंत या सांपडले जे
गुंडाळिति ते समूळ लाजे
अवश घुमविले विना इलाजें—
पुरूरव्याचें वेडचि रामीं !

प्रियेसमोर किं मोर पिसारा
पसरी, नाचे पिसा बिचारा
कोण चालवी चाळा सारा ?
पुसुनी पाहीं अंतर्यामीं.

भृंग दंगती जैं मधुरंगें
पुष्पपरागें भरती अंगें,
मधुप योजिले एविं निसर्गें
बोट मधाचें लावुन कामीं !

भेट वाटते जी स्वर्गाची
जोड जणूं जी त्री–वर्गाची
तीच निसर्गें निजसर्गाची
सोय केलिसे खाशी नामी.

कल्पांतीं जें मुळींच न ढळे
प्रेम हवें तव मलाच सगळें
आग्रह कां हा ? खुळे ! आढळे
काय कवींना तें निजधामीं ?

मानव मोठा वृथाभिमानी
अंतवंत तें अनंत मानी
जूं सृष्टीचें कसें जुमानी ?
प्रेम–कल्पना कृत्रिम निर्मी !

नाशिवंत ही मनांत भीती
जनीं पुकारी अमर प्रीती
सृष्टिखेळ हा पुरी प्रचीती
मिरास मानी ही अध्यात्मी.

आत्म्याचा हा भाव म्हणावा ?
देहाची ही हांव गणा वा
प्रेम म्हणा वा काम म्हणा वा—
राम नसे गे ! मुळींच नामीं.

केवळ सत् हें इतर असत् गे
इथें जागतें क्षणांत चित् गे
आनंद खुले इथें महत् गे
प्रकृति–पुरुष हो लीन ब्रह्मीं.

# कंटाळा

[ जाति : दयिता

काय एकट्या या प्राण्या येत असे कंटाळा ?
ब्रह्महि निर्वेदा पावे पुराण हा निर्वाळा.
नये टाळितां कोणाला जुलुमी हा कंटाळा.

पृथ्वी राणीसामोरा दरबारी सरदार
पाठीमोरा होईना चंद्र फिरे लाचार–
काय रुचे हा त्या आचार ? काय नये कंटाळा ?

पृथ्वी सूर्याभोंवती फुगडी वेडी घाली
स्वानंदीं गिरक्या घेतां झुके झिंगत्या चालीं–
कैफाचा तिज कधिंकाळीं काय नये कंटाळा ?

ग्रहमालांचा मध्यमणी शोभे भास्कर नित्य
रासक्रीडे त्यां भगवान् आकर्षी कीं सत्य–
कळतां त्याला औचित्य काय नये कंटाळा ?

मधेंच वारा कधींतरी सैरावरा धांवे
दुज्या क्षणीं जणुं बाळ गुणी गाऽढ निद्रे पावे–
हूडपणाच्या या डावें काय नये कंटाळा ?

अखंड धडपडती पुढती जलधीच्या त्या उर्मी
भरती येतां चढाइ हो व्यापिति ना नव भूमी–
खेळ रिकामा त्यां नामी कां नाणी कंटाळा ?

स्वयें निर्मिल्या विश्वाचा चलच्चित्रपट पाही
जगन्नियंता असेल जो, सदा बघत तो राही–
अनंत बघतां तो नाहीं येत तया कंटाळा ?

# माळ्याची चाकरी करणाऱ्या
# शेतकऱ्याचा विलाप

[ जाति : परिलीना

पुरे पुरे माळ्याची चाकरी कि झाली
शेताची, खेड्याची सई ना बुझाली ॥ ध्रु. ॥

*फाफुटकी, करवंदी, विंचु, सापकांदा,
शोभा कां त्यांची ये काराळ्या गेंदा
त्यांसाठीं रान कधीं पायतळीं घालीं ?

राजहंस–हरळीची शीतळाइ न्यारी
कृष्णेच्या कांठीं म्यां सोडावी न्हारी
भाकर कां जाईना येथ घशाखालीं ?

फुलें याच माळ्याचीं नामांकित भारी
नवीं नव्या मोसमांत वाखाणति सारीं
वावरिचें पीक बरें, माय खरी काळी !

मोट कधीं हांकिन मी सकाळच्या पारीं
सूर खडा चढवोनी गाणीं ललकारीं
खेळाच्या झारीची शिसारीच आली !

ढवळ्या पवळ्या माझी आवडती जोडी
जिंदगिचे संवगडि ते ठाव्या मज खोडी
चुचकारुन वैरण त्यां घालीं कधिकाळीं ?

जोंधळा न खेळविला फार दिवस हातीं
डवऱ्यांचे गोंधळ कां घुमत ते रहाती ?
जीव घरीं जायाला होतो वरखालीं !

# श्रीज्ञानेश्वर

[ अभंग

१

कीर्ती अनश्वरा । तुझी ज्ञानेश्वरा ।
वाचेच्या ईश्वरा । देई वरा ॥
दुजें कांहीं एक । मागें न आणिक ।
म्हणा हा पाईक । मराठीचा ॥
मराठी सारजा । तिची दिव्य पूजा ।
कवींच्या अग्रजा । बांधिली त्वां ॥
पवित्र रावळीं । देवीच्या जवळी ।
मूर्ती न बावळी । आन शोभे ॥
झाडीन आंगणें । द्वारीं लोटांगणें ।
ह्यांचींच मागणें । मिराशी म्यां ॥

२

इंद्रायणी कृष्णा गोदा भीमा भागा ।
ह्याच श्रुतिगंगा महाराष्ट्रा ॥
धन्य धन्य त्यांत श्रेष्ठ इंद्रायणी ।
अमृतवाहिनी मराठीची ॥
देहू आळंदी हीं पुण्य मायक्षेत्रें ।
पवित्र या यात्रे सभागी ये ॥
धन्य धन्य मासे देहूच्या कांठींचे ।
वेद मराठीचे तारियेले ॥
त्यांनाच ही शोभे आळंदीची वारी ।
आणिती या द्वारीं परतवाण ॥

## ३

रोपिलें जें बीजमूळ ।
झाला सोन्याचा पिंपळ ॥
छाया नांदते शीतळ ।
दारीं मराठीच्या ॥
नव्या नव्या युगवेळे ।
वारा पानीं सळसळे ॥
पारा बैसतांच मिळे ।
सकळ मनोवांछित ॥
करी मातीचे सैनिक ।
सातवाहन स्थापी शक ॥
युगपुरुष तूं लौकिक ।
रेडा वैदिक केलासे ॥
भिंत मराठीची राया ।
जावो स्वागत कराया ॥
नूर सिद्धीचा उतराया ।
आज वाघिणीचा ॥

# चोरीचा माल

[ जाति : रसना

हरिलेंस जातजातां
तूं आपुल्याच छंदें
स्वत्वास सर्व कां गे ?
माझें मला पुन्हा दे.

आभाळ या मुखीं ये
काळोख खिन्न नांदे;
तें हास्य नेहमीचें
माझें मला पुन्हा दे.

दचके भिऊन वाणी
ही आपुल्या निनादें;
लोपे सरस्वती ती
माझी मला पुन्हा दे.

त्यजुनी भुलोन गेली
प्रतिभा तुझ्याच नादें;
तूं पाश सोडवोनी
माझी मला पुन्हा दे.

सारें तुझ्याकडे बा
ठेवीं खुशाल मोदें;
मी मागणार नाहीं
माझें मला पुन्हा दे.

परिसें परी विनंती
केली न ही विनोदें
ज्याच्याच जाचणीनें
माझें मला पुन्हा दे

ऐसें फिरून मागें
हृदयास त्याच जागे
जा घेउनी त्वरें गे
राहील तें न मागें

# एकाकी

मी एकाकी मी एकाकी
मज नको कोणी बाकी ॥ ध्रु. ॥

तेजोगोळाची मी गंगा
आकाशाभर घालीं दंगा;
गोल पावतां तेजोभंगा
लुकलुके तारिका कुठें वराकी.

सूरांत मी षड्ज आधीं
गज फिरे घुमे नादीं;
अलग होतां विरे समाधी
वादीसंवादीच्या धाकीं.

जीवनाचा मी तुषार,
तेज जधीं मज भेदी पार
स्फुरे इन्द्रधनूविस्तार;
प्रभो प्रवाहीं कधीं न टाकीं.

"बहु स्याम्" ही ना आसक्ती,
सान असा माझी शुक्ती,
मिळे तेथ पैं जीवन्मुक्ती
तळपें तेथें सदा चकाकीं.

# कलहान्तरितेची होरी

[ जाति : पादाकुलक

आला हा बघ महिना फाग
आल्हादाचा दावी मार्ग;
पुढें होरिचा रंग नि राग
अनुरागाचा साधीं लाग.

सुटला शिव–रात्रीचा वारा
जीर्ण कलींचा शुष्क पसारा
आतां त्याला कैंचा थारा
उडो त्यासवें तुझा ग राग !

पहिलि कोकिला आकुल बोलें
मीलन–रागिणि घोळुनि डोले;
अजुनी तुझिया हृदयीं बोले
कां कलहाचा कर्कश काग ?

वसंतभावें आम्र तवरला,
पुलकांनीं हा देह बहरला;
गंधोन्मादें पुरा भारला
हृदयाचा या सारा बाग.

डंख मारितो अनंग–नाग
प्रखर चेतली चित्तीं आग
गुणगहिने ! उरिं वेगें लाग.
आला हा बघ महिना फाग.

# देणगी

[ जाति : पादाकुलक

देणगी तुला ग देउं काय ?
जिवलगे हो ! मती गुंग होय ! ॥ ध्रु. ॥

मोति माणिकें वा पाच हिरे
खडे इतरही फिके नि गहिरे
ओतिति पायीं जरि जवाहिरे
ऐश्वर्य सर्व नखीं समाय.

सुती रेशमी जरी नगांचे
ढीग रचूं का उभ्या जगाचे ?
रंग सवंग नको सणगांचे—
कांतिवंत तव मुलायम काय.

कीं प्रतिभेचा घेउन वाणा
कुकल्पनांचा देउन ताणा
शब्दीं कोळिष्टकें कां विणा ?
कोण कवी तव गुणगण गाय ?

हृदयें काढीं अलायबलाय
केवळ उरला हाच उपाय—
वस्तु तुझी तें कसें छुपाय ?
लाथाडिल कां हृदया पाय ?

# मराठी कवींस कलगीचा अहेर

[ जाति : परिलीने सारखी

ऐकविण्या ऐशीं काव्यें कवी सज्ज व्हा हो
ऐकतांच ज्यांचा घेतिल सकल लोक लाहो.
उपरि कोकिळेचा तुम्हां अवेळीं ळळा कां ?
गल्बल्यास साळुंकींच्या कधीं भाळलां कां ?
घुबडांच्या घूत्कारांनीं अशुभ बोलवा कां ?
भावि शुभा आतां काव्यीं पिंगळाच बाहो !

* * *

इष्क बाउ कवळ्या पोरां–भावगीत हें ना.
सगनभाउ गवळी होना, लावणी बरी ना !
मर्द मस्त इष्कें वेळीं मस्तकही ठेवी
कामचलाऊ ती प्रीती पशूही न सेवी.
प्रबळ राधिकेची बाधा ? उगाच कांगावा !
दीपपतंगाचा साधा खेळ न कां गावा ?
शिनळ मोहनेची प्रीती अढळ खरी होती
सती जाय जारासंगें सती कां न हो ! ती ?

* * *

मालसुरे तानाजी वा गोखलखां बाजी—
माल जुना, सूर नवा–ही फुकट ऐटबाजी !
शिलंगणा सालोसालीं पुढें पुढें जातां
पलीकडे पैलाडाच्या ;–पुढें कुठें आतां ?
निघे नगाऱ्याची घाई, फुंकुनी तुतारी
प्राण जरी गेले–विनिची हले न कां स्वारी ?

* * *

सवाल कीं सलगीचे हे, वांकडे न, साधे
रोकडाच कलगीला या जबाब ज्या साधे
गाइ महाराष्ट्राच्या जो प्रेमशौर्यगाथा
कवीराय शाहीराच्या पाइं ठेवुं माथा.

# कविभाईंस

[ दिंडी

मुक्तछंदें कवि ! रक्तसूक्त गा गा !
झोंपि गेलेल्यांमाजि तूंच जागा ! ॥ ध्रु. ॥

*                    *                    *

दीसबुडतीचें येइ जें वऱ्हाड
त्यास नांदाया भविष्यीं बिऱ्हाड
गगनचुंबी बा ! बांधिती खुराड
उघडतांना तें स्तोत्र तुझें जा गा.

इतर सारें हो जरी बेचिराख
ऊर्ध्वमूलांचा बोधि अध:शाख
खडा राहे ;—बाहील पान लाख
मला दिड्सूढा निवाऱ्यास जागा.

*                    *                    *

बंब नोहे—शोभाच या पुराची
नव्या स्वर्गाची रांग गोपुरांची
वर्ति सुरवधुनेत्रांस कर्पुराची;
अप्सरांचे स्वर गिरणिचा किं भोंगा !

मंत्र यंत्रांचा मदें त्वां जपावा
करीं धांवा "गोपालकृष्ण पावा
ऐकुं इन्द्रप्रस्थि दे पुन्हा पावा
येउं माया ही मयाची न भोगा !"

*                    *                    *

जीवनाचे मंथून तुला सिंधू
लाधलें जें मृत दुरुन त्यास वंदूं,
निकंदूं दे सुंदोपसुंद बंधू
झुंजि फुंजें त्या फुंक्र तुझ्या शिंगा.

वनतलावीं ती शांति हरितवर्ण
मला लाधो—विस्तीर्ण जेथ पर्ण
बघों नेदी कमलास बिंब पूर्ण
कुणा हरिणा वा डौलदार शिंगा.

# मिटल्हॉल्झर

कोसळे कड्याचा कां हा तुकडा ?
गडगडत ये बर्फ कां बुडा ?
उड्या घेत ये काय हा निर्झर ?
हा तर—
मिटल्हॉल्झर ! मिटल्हॉल्झर !

लोळणें नावडे या भुइवरी
वावरे सदा हा उपरी उपरी
गरुडाची याची हवाई सफर.
हा तर—
मिटल्हॉल्झर ! मिटल्हॉल्झर !

तुंग नगावरी घिरट्या घाली;
चढे वा पायीं; पाहातो खालीं—
मेघमंडळीं कीं हा विद्याधर !
हा तर—
मिटल्हॉल्झर ! मिटल्हॉल्झर !

अभिलाष या सदा चढायाचा,
यंत्रांच्या पाखांचा गर्व पायांचा,
चढे तो पडे ? वीरा ना कदर !
हा तर—
मिटल्हॉल्झर ! मिटल्हॉल्झर !

साहसी वीराचें सरतां आयु
—रावणें तोडिल्या पंख जटायु—
घसरे खालीं—दैवाची नजर !
हा तर—
मिटल्हॉल्झर ! मिटल्हॉल्झर

# स्वातंत्र्य व समता

(१९२८–१९३८)

[ वृत्त : शार्दूलविक्रीडित

१

मित्रा ! तूंहि तसेच लोक सगळे वेडा म्हणोनी मला
संबोधीत रहा परी मज नसे त्याची मुळीं रे क्षिती.
तुम्ही सर्व असाल सुज्ञ तरि ती लाभो तुम्हां सुज्ञता !
माझें वेड बरें मला, मज नको संसर्ग तीचा कधीं !
डोळेही असुनी तुम्हां दिसत ना कानांस ऐकूं नये
चालो संथ अखंड जीवित,–खरी शांती विवेकी बरी
श्रीमंतींत मदांध चैन करिती ज्याच्या श्रमानें तया
मित्रा ! कामकऱ्यास घांस न सुका खायास तोही मिळे.
त्याचें रोदन आर्त मूक घुमतें कानीं सदा माझिया.
झुंजाया अफिणी चिनी उतरती स्वातंत्र्य रंगीं झणीं !
कांहींना अझुनी गुलामगिरिच्या पंकींच लाभे सुख :
त्यांचें दास्य मलाच कां दुखवितें शल्यापरी सारखें ?

रे वेड्या बरळोनि काय मिळतो सुज्ञांपुढें फायदा ?
वेडे या जगिं होउं दे अधिकसे, प्रार्थीं असें सर्वदा !

२

वेडा मागत एक, देव परि दे, दोन्ही तयाला वर
वेडा घाबरला, पुन्हा विनवितो " देवा ! दया आवर ! "
स्वातंत्र्यार्थ असंख्य वीर लढती सर्वस्व ज्यां भूवर

वाटे कीं अपुलेंच राष्ट्र, इतरां तें बंधु ना मानिती.
त्यांना आज हवें स्वराज्य, परवां साम्राज्य ते मागती,
स्थापोनी जगतांत तंत्र अपुलें स्वातंत्र्य तैं भोगिती
सत्तेचेच गुलाम अंतिं! —परकी सत्ता झुगारूनिही !
" भाऊबंदकि माजवा " गरजती, रक्ताळलेली ध्वजा
भाई घेउन राव–रंक कलहीं खाईकडे धांवती.
" रावांचीं रचुनी शवें मग वरी बांधूं मनोरे नवे !
रंकांचे सुलतान जेथुन जगीं द्वाही पुकारीतिल
' वित्तासाठिं अखंड राबत रहा; मुंग्यांस माना गुरू ' ! "

रे वेड्या ! बरळोनि काय मिळतो वेड्यांपुढें फायदा ?
घेई हें प्रभु वेड, माणुसकि दे, ऐसा करीं वायदा !

# खरा मुस्लिम

मी पामर मी पामर
छत्र धरीं ढाळीं चामर
कीर्ती तुझी अजरामर
बंदी सदा गाईन

मी पामर मी पामर
घोर संसार समर
होई पाईक अमर
झेंडा लढवीत

मी लाचार लाचार
माझे आचार विचार
तूंच चालवीं साचार
माझा भार तुजवरी

मी दुबळा दुबळा
वाढवीं रे माझ्या बळा
लंघी कां न पांगळा
नभ रवीसंगें ?

नुरे माझें असें कांहीं
अहंकार परी राही
अर्पी तोही आतां पाहीं
पायीं तुझ्या अनंता !

# शून्य लब्धि

ज्यानें सुख मला दिलें
दुःख त्यानेंच घेतलें
हिशेबाची तोंडमिळणी
देण्याघेण्या झाली जुळणी
पुरी होतां वजाबाकी
आतां कांहीं नुरे बाकी
रोखा परतोनी फाडिला
फडशा कर्जाचा पाडिला
हातीं सांठविलें शून्य
झालों मोकळा मी धन्य !

# न ल–द म यं ती

[ मिश्रवृत्तें

ही कोणी लिहिली कधीं कथा गे !
विद्वानां अजुनी न थांग लागे.
कोणाला परि माहिती हवी ती ?
आम्हाला दिसते नवी नवी ती.
गावोनी बहुधा तिला सदा गे
आर्यांनीं विणिले जिवांत धागे;
त्यांमाजी झळके कलाबतूसी
प्रीती जी दमयंति दे पतीसी
नलाच्या जो हृदयीं अनल पेटे
शिखा त्याची अजुनी कुठें भेटे
त्याग–यज्ञीं हविला कवण घाली
स्वर्गि नेण्या ?—न मिळे भीमबाळी !
विशुद्ध प्रेमाचा सति-हृदय आदर्श विमल
तया झांकोळाया प्रबळ करिती देव रमल
नलाची तें मूर्ती प्रगटवि परी पंचनळिंही
प्रसादाला त्याच्या मलिन करिना अल्प कलिही.
वद नल-दमयंती यांत गे थोर कोण ?
झळ मुळिं न सखीला लागुं द्यावी म्हणून
खडतर निजकष्टां एकला कोण साही ?
परत कधिं मिळे तो—भीमकी वाट पाही—
अदय पति सती जो टाकितो रानिं घोर !
वद नल–दमयंती यांत गे कोण थोर ?

# सुकलेलीं फुलें

[ वृत्त : वसंततिलका

त्वां जीं फुलें सजणि ! पाठविलीं मला गे !
ताजीं न, वास परि गोड विशेष लागे.
तोडीस फूल दुसरें न उभेंच राही
त्यां प्रीतिचा मुळिंच गंध नसे जराही.

पत्रांतुनी सहज पाठविलीं तुवां हीं
निःशेष शब्द परि होत सुगन्धवाही
हा प्रीतिवास बिलगे, न कधीं निघे तो
तद्ध्यास धन्य नर दास बनून घेतो !

*तारा जिच्या सकळ मेळविल्या अपाप
तन्त्रीच तूं विरहिं मूक नसे मिलाफ
त्या छेडितां मनसिजें मग धून लागे
तैं मूर्च्छना स्फुरत कोमल तीव्र रागें.

निर्गन्धि पोकळहि वर्णसमूहिं काय
ती गतिमोहिनि कधीं पुरती समाय ?
त्वां खास त्यांसह फुलांस किं पाठवीलें
त्वत्स्नेहसार सगळें सखि ! सांठवीलें.

आमोद मस्त परि नाजुक लाजरासा ;
शृंगारही सुचविते शुचिता जरासा ;
पावित्र्य हें भुलवितें, खुलवी विलास—
त्वां धाडिलें प्रतिनिधी म्हणुनी फुलांस.

# मुलांचा खेळ

[ वृत्त : शार्दूलविक्रीडित

गोळा होउन खेळती पुळिणिं तीं वाळूंत बाळें पहा.
वेळा जी पसरे अफाट करिती व्यापून ती आपुली.
त्यांना खेळ न तो मुळींच दिसतो, सृष्टी नवी निर्मिती,
वेधे लक्ष तिथेंच, चित्त सगळें एकाग्र सामावलें.
देवाची अतुला अतर्क्य रचना भासे भिकारी तयां.
खात्री वाटतसे फुकाच खपला तो विश्वकर्मा खुळा !
कोणी पोखरि बोगदे तर कुणी खोदीतसे कालवे,
किल्ले बांधि कुणी जणूं युग जुनें स्थापीत उद्धारुनी.
केले थोर बुरूज रोवि विजयें उंच ध्वजां त्यांवरी.
यावच्चंद्र दिवाकरौ टिकविण्या सौंदर्य विज्ञानही
कोणी अक्षर–वाङ्मया लिहितसे, आलेख्य रेखी कुणी.
मागें ठेवुनियां स्मृती परतती संतुष्ट सांजे मुलें :

वाटे त्यां कृतकृत्यता स्वकृतिंचा मोठा स्फुरे गर्वही–
काळाला चढतांच युद्ध-भरती गेलें लया सर्वही !

# प्रार्थना

[ वृत्त : लयग्राहि

माझी तुला ईश्वरा प्रार्थना ही
कां ती प्रभो ! मान्य होणार नाहीं ?
मागें न मी पुत्र वित्तादि सत्ता
सिद्धी नको, मुक्ति कैंची प्रमत्ता ?

माझी तुला प्रार्थना ईश्वरा ही
राहो न कोणीहि दु:खी जराही
चैतन्य-सौंदर्य-आनंद माजो
तूं सच्चिदानंद हें ब्रीद साजो.

कोठें रडे मूल, बावे श्रमानें
कोमेजतें फूल कोठें हिमानें
त्यांची कळी हांसवीं रे फिरोनी
दे शुद्ध आनंद विश्वीं भरोनी

भूमी गिमीं वृष्टिला ताहनेली
जी स्त्री तशी तान्हुल्या आसलेली
माता करीं तीस चालो अबाध
हा जीवनस्रोत फोडोनि बांध

कोठें असे रुग्ण—कोणी असो तो—
—घायाळ युद्धांत, कुष्ठे कुसो तो
कीं व्याघ्र गुंफेंत—त्यांचीं शरीरें
उल्हास—उर्मींत आल्हादवीं रे !

ये त्रस्त आत्मा जरी आढळांत
—कीं माड वेळेवरी वादळांत—
भारी मनश्चक्रवातें भ्रमेला
बेताल तो क्षोभ येवो समेला !

पावित्र्यगंधास मोहे निजाच्या
आत्मा अहंकारपद्मांत ज्याचा
बंदी पडे—मुक्ति दे त्यास देवा !
काळद्विपें घात होई पुढें वा !

पापें जरी चित्त व्यापे कुणाचें
—कीं व्योम काळ्या थव्यांनीं घनाचे—
वर्षाव त्यांतून होवो दयेचा
हो ज्योतिचा नाच तेजोमयेचा.

ही प्रार्थना आर्य पूर्वीं करीती
मी गाइली तीच काव्यैकरीती
जाणें बरें लक्ष तूं का न देशी
माझी नसे शुद्ध बुद्धी पुरेशी.

सांगेन लाटांस गर्जा सदा ही
द्वाही दिशा वायु नेईल दाही
गातील तारेहि ती अंतरीक्षीं
कैसी उपेक्षीसि तूं सर्वसाक्षी ?

# टीपा

पा. ९ तांब्यांच्या बऱ्याचशा कविता माळव्यांत लिहिलेल्या आहेत. "जन पळभर म्हणतील हाय हाय!" "ताजमहाल" इत्यादि कविता त्यांचें भर्तृहरीशीं केवळ स्थळाचेंच नव्हे तर मनःस्थितीचेंही साम्य दर्शवीत नाहींत काय?

पा. १८ ह्या कवितेंत वृत्ताच्या मिश्रणाचा प्रयोग निर्हेतुक पण अनायासें घडला आहे.

पा. १९ पहा मेघदूत "श्रोणीभारादलसगमना स्तोकनम्रा स्तनाभ्याम्"

पा. १९ कृष्णशास्त्री चिपळूणकरांनीं मेघदूताचें साकी वृत्तांत उत्कृष्ट भाषांतर केलें आहे. त्या कवित्वाचें निवेदन अरसिकांना येथें करून दिल्याबद्दल त्यांची क्षमा याचितों.

पा. २२ पेट्रार्कादि परकी कवींचें "चतुर्दशक" ऊर्फ "सुनीत" मला प्रिय आहे हें अन्यत्र या संग्रहांत दिसून येईल. घरच्या जयदेवादींचीं अष्टकें किंवा अष्टपद्या यांची आठवण ठेवण्या-साठीं हा प्रयोग केला आहे.

पा. २५ सप्तर्षि ह्या पुंजांतील दोन प्रधान तारे नेहमीं ध्रुवाकडेच दाखवितात या दृक्प्रत्ययास उद्देशून ही ओळ लिहिली आहे.

पा. ३२ सुकेशी— "बेरोनिसीस हेअर (कोमा बेरोनिसीस)" हा तारकापुंज सप्तर्षींच्या पुंजाजवळ दिसतो. याला "वेरण्यकेशी" असें समानध्वनिक नांव काकासाहेब कालेलकर सुचवितात. कवितेंत मी "सुकेशी" हें सुटसुटित व सुगम नांव घातलें आहे. ह्या वरेण्यकेशी उर्फ सुकेशीची गोष्ट चित्तवेधक आहे; व ती येथें सांगण्याचा मोह आवरत नाहीं. बेरेनीस ही इजिप्तचा राजा तिसरा टॉलेमी याची पत्नी. तिच्या केशभाराची ख्याति सर्वत्र पसरली होती.

तिच्या पतीनें एकदां सिरियावर स्वारी केली; तेव्हां तिनें असा नवस केला कीं तो जर स्वारी फत्ते करून सुखरूप परत आला तर मी माझे केस कापून आर्सिनोच्या देवळांत देवास वाहीन. कालांतरानें राजा सुखरूप परत आला; व राणीनें आपला संकल्पित नवस फेडला. तिनें आपले केस कापून ते देवळांतील पुजाऱ्याच्या हवालीं केले. तिच्या त्या सुंदर केसांची दुर्दशा पाहून राजा फारच क्रुद्ध झाला. पण धूर्त पुजाऱ्यानें त्याची खालीलप्रमाणें ताबडतोब समजूत घातली. राणीच्या सोनेरी केसांच्या झुबक्यासारख्या दिसणाऱ्या एका तारकापुंजाकडे बोट दाखवून तो म्हणाला, "राजा! हे पहा तुझ्या राणीचे केस देवांनीं स्वर्गांत कायमचे नीट जतन करून ठेवले आहेत. यापुढें पृथ्वी वरील सर्व लोक अनंतकाल त्यांना पाहून त्यांची कीर्ति गातील" पहा—'The Stars in their Courses' by Sir James Jeans, pp. 12–13.

पा. ३७ उत्तर–मीमांसा–या शब्दप्रयोगांतील श्लेषाविषयीं सुज्ञांशीं अधिकोत्तर नलगे.

पा. ४० चंद्राची आम्हांस एकच बाजू दिसते म्हणतात.

पा. ४१ पुण्या-मुंबईच्या नागरिकांस हीं फुलें महाबळेश्वरास गेल्या–शिवाय दिसणार नाहींत.

पा. ४३ तुकारामाचे अभंग इंद्रायणींतील माशांनीं बुडूं दिले नाहींत असें सांगतात. आषाढी–कार्तिकी एकादश्यांच्या दरम्यान देहूचे मासे आळंदीला भेट देऊन परत येतात असा समज आहे.

पा. ५८ लॅटिनमध्यें ज्यांना Nebulœ म्हणतात त्यांस मी तेजोगोळ ही संज्ञा दिली आहे.

पा. ५० गेल्या तीस–चाळीस वर्षांत मराठी काव्याची तीन विशेष दिशांनीं झालेली वाढ या कवितेच्या पहिल्या तीन कडव्यांत दर्शविली आहे. विलायती वृत्तांची जी निरर्थक उसनवारी केली जाते तिला उद्देशून पहिलें कडवें लिहिलें आहे. गडकऱ्यांच्या दोन प्रख्यात कवितांचीं नांवें केवळ उपयोगी वाटलीं म्हणूनच त्यांत गोंवलीं आहेत; त्या कवितांवर असा खास कटाक्ष नाहीं. दुसरें कडवें आधुनिक प्रेमगीतांना उद्देशून आहे. कॉलेजाच्या विश्वांतील प्रेम व मर्दांचें प्रेम यांतील फरक कळत नसावा म्हणून कदाचित् "कृष्णसख्याच्या व्यभिचाराचा" कांहींजण उपहास करितात. सुधारणा व प्रगति यांची टिमकी वाजविणाऱ्या तसेंच वडिलांची कीर्ति सांगणाऱ्या धंदेवाईक कवींना तिसऱ्या कडव्यांत कांहीं सवाल विचारले आहेत. येथें सुद्धां कांहीं सुप्रसिद्ध कवितांचा उल्लेख आला आहे; पण त्या कवितांवर टीका करण्याचा हेतु नाहीं.

पा. ५२ शांति देणारी आर्यांचीं संस्कृति, यंत्रांचें युग, कम्युनिस्ट कला व कल्पना, यांच्या गुजगोष्टी या कवितेंत केल्या आहेत. रशियांत, व कांहीं अंशीं अमेरिकेंत यंत्रें, "स्काय्–स्क्रेपर्स" व वर्गकलह हेच काय ते काव्याचे खरे विषय समजले जातात. आमच्या देशांत या भाग्योदयाचीं चिन्हें दिसूं लागलीं आहेत. ज्ञानेश्वर, रामदास, तुकाराम सारे सरंजामशाहीचे पुरस्कर्ते ठरले; आणि आशियाखंडांतील अत्युच्च इमारतही मुंबईत नुकतीच खुली केली गेली!

पा. ५४ लंडन टाइम्सच्या ११ मे १९३७ च्या अंकांत हेर् वॉल्टर मिटल्हॉल्झर यांचा मृत्युलेख मीं वाचला. हे एक सुविख्यात स्विस् वैमानिक होते. विमानकलेच्या बाल्यावस्थेंत म्हणजे

गेल्या महायुद्धाच्या काळीं यांना उड्डाणाचें वेड लागलें. वयाच्या एकवीस ते बेचाळीस वर्षांच्या जीवनांत त्यांनीं अनेक धाडसी उड्डाणें केलीं. विशेषतः उत्तुंग पर्वतशिखरां-वरून विमान चालविण्याचा त्यांना अनावर शोक होता, पर्वतांवर उडण्याइतकेंच त्यांना पायीं पर्वत चढण्याचें वेड होतें व शेवटीं स्टिरियांतील एक हिमनगं चढत असतां एक हजार फुटांवरून खालीं पडून त्यांचा अंत झाला. त्यांच्या या मृत्युप्रसंगास उद्देशून ही कविता लिहिली आहे.

पा. ५८ मुस्लिम = आरबी धात्वर्थ परमेश्वरास सर्वस्वीं शरण गेलेला

पा. ६१ अपाप = आपोआप.

# मुक्तक आणि भावगीत

## १

या संग्रहांत ज्या प्रकारच्या कविता आहेत तो काव्य-प्रकार इंग्रेजी वाङ्मयापायीं आपणांकडे प्रथम चालू झाला असा एक लोकभ्रम रूढ झालेला दिसतो. याची जात "लिरिक्" हीच मुळीं परकी असें समजतात. याला हिंदी करून आपल्या गोत्रांत घेण्यापूर्वी याचें अन्वर्थक नामकरण काय करावें हा बिकट प्रश्न सोडविण्यांत बरेच टीकाकार गुंतलेले दिसतात. कोणी म्हणतात कीं, याचें मूळचें कुळ ध्यानांत घेऊन यास "वैणिक" ' किंवा "वीणाकाव्य" म्हणावें; तर याच्या शीलाकडे लक्ष पुरवून यास "भावगीत" हें नांव मुक्रर करावें असा कांहींचा आग्रह दिसतो. या नाममाहात्म्याचा विचार मी पुढें योग्य स्थळीं करीनच. आधीं या काव्य-प्रकाराच्या संस्कृत व मराठी परंपरेची पूर्वपीठिका पाहूं.

## २

आमच्या काव्याच्या इतिहासाकडे मागें वळून पाहाणाऱ्यास सकृद्दर्शनीं असें वाटण्याचा संभव आहे कीं, अगदीं आरंभीं पुराणांचें युग होतें, मग महाकाव्यांचें, व आतां अलीकडे कुठें स्फुट कवितांचा जमाना चालू झाला आहे. हल्लीं महाकाव्यें निर्माण होत नाहींत अशी हाकाटी करणारे टीकाकार असा आभास निर्माण करतात कीं, सामाजिक जीवनाप्रमाणें काव्याच्या संसारांतसुद्धां पिढीचा सारखा ऱ्हासच होत गेला आहे. सध्यां काव्याच्या पोरखेळाचा काळ चालू आहे अशी कुत्सित टीका आधुनिक कवींवर कधींकधीं केली जाते. संस्कृत काव्य म्हटलें म्हणजे प्रथम व्यास-वाल्मीकि हे पुराणपुरुष दिसतात; मग कालिदास-भारवि इत्यादि महाकवि डोळ्यांत भरतात. साहजिकच असें वाटतें कीं, संस्कृतांत तरी स्फुट प्रासंगिक कविता झालीच नसावी. ग्रीकांत होमरबरोबर सॅफो व पिन्डार यांचीं नावें घेतां येतात; पण आमच्याकडे त्यांचे समानधर्मे दिसत नाहींत.

मानवजातीच्या बाल्यावस्थेंत गोष्टीवेल्हाळ पुराणिकांचा भाव अधिक असतो हें खरें. तथापि स्फुट प्रासंगिक कवितांची परंपरा वास्तविक पुराणांच्याही पलीकडे जाते. जगांतील अत्यंत जुनें काव्य ऋग्वेदांत सांपडतें. तें पुराणही नाहीं, आणि महाकाव्यही नाहीं, हें सांगणें नलगे. सूक्तांचें काव्यवस्तु कांहींही असो, ऋग्वेद हा स्फुट कवितांचा जगांतील पहिला संग्रह आहे हें नाकबूल करतां येणार नाहीं. इतकेंच नव्हे, तर या काव्यप्रकाराचे जे मुख्य गुणधर्म मी पुढें विस्तारानें मांडणार आहें ते सारे ऋग्वेदांतील सूक्तांत आढळतात. दहाव्या मंडलाचा विशेष दाखला आपण घेऊं. प्रत्येक सूक्तांत स्वतंत्र कल्पनेचा अनुरूप गीतविस्तार विकास पावलेला दिसेल. एकीकडे[२] पुरूरवा-उर्वशीचा फुलपांखरां-सारखा शिवाशिवीचा उल्लू खेळ चालू आहे; तर दुसरीकडे[३] नासदीय सूक्तांत, मन शोधून, हृदय तपासून, जें असत् त्यांतच सताचें नातें गवसण्यांत कवी गुंतले आहेत. मध्येंच मद्याचा बेहोष उन्माद "काय मी सोम प्यालों कां?"[४] या पालुपदानें द्रुततालांत धिंगाणा घालतो; तर त्याच्याजवळच "एकला खातसे त्याला मिळे पापचि केवळ"[५] यासारखा साम्यवादाचा अपरिग्रही आग्रह प्रस्थापित केला जातो. जिच्या नांवावरून एका सुरतासनाला कामशास्त्रांत संज्ञा प्राप्त झाली त्या इंद्राणीचा उद्दाम काम "न मत्स्त्री सुभसत्तरा न सुयाशुतरा भवत् । न मत् प्रतिच्यवीयसी न सक्थ्युद्यमीयसी ॥[६] या ऋचेनें पौरुषाला आह्वान देतांना पाहून वॉल्ट् व्हिट्मन् व डी. एच्. लॉरेन्स् यांच्यासारख्या आधुनिकांना देखील आनंद झाला असता. तसेंच आपला निग्रह काय कामाचा हें पुरतें कळून चुकून जुगाराच्या वागुरेंत गुंतलेल्या[७] जीवाची पश्चात्तापयुक्त धडपड ज्या सूक्तांत सांपडते तें सूक्त कुणा वास्तव-वाद्याला आवडणार नाहीं? माझ्या मतें वैदिक काळीं काव्यरंगणांत चालू असलेल्या बहुरूपी खेळाचे हे वर दिलेले नुसते मासले असावेत; स्फुट काव्याचें सगळें विश्व संहितेंत खचित सांठविलेलें नाहीं. संस्कृत काव्याचा हा उगम आपल्या डोळ्यांसमोर नसतो. कृष्णेच्या प्रवाहाबरोबर वाहात जातांना महाबळेश्वराच्या डोंगरांत झिरपणाऱ्या बारीकसारीक झऱ्यांचा साहजिकच विसर पडतो. पण महानद प्रारंभींच प्रपातरूपानें ज्याप्रमाणें सहसा पडत नाहीं, त्याप्रमाणें कोणाही कवीच्या मनांतून, कोणत्याही युगीं, महाकाव्यच प्रथम अवतीर्ण झालें असेल हें संभवतच नाहीं. संस्कृत साहित्यकार हें पुरतें

जाणून होते. म्हणूनच काव्याचा आद्य अवतार कसा झाला हें सांगतांना वाल्मीकीच्या "मा निषाद प्रतिष्ठां त्वमगमः शाश्वतीः समाः। यत्क्रौंच-मिथुनादेकं अवधीः काममोहितम्॥" या श्लोकाचाच ते नित्य आधार घेतात. भावगीताचा हा एक अत्युत्कृष्ट नमुना आहे हें मला पुढें सांगावयाचें आहे. एवंच, काव्याचा उगम पुराणांत किंवा महाकाव्यांत नसून प्रासंगिक स्फुट भावगीतांत आहे अशीच संस्कृत साहित्याची परंपरा होती.

कवीन्दु वाल्मीकीचा उदय होण्यापूर्वीच्या दर्शकाळींच्या आकाशांत स्फुट कवितांचीं ताराशतें इतस्ततः विखुरलीं असलींच पाहिजेत. त्यांतील तेजस्वी तेवढीं संहितेंत गोळा केलीं गेलीं. "श्रुति" म्हणून हा संग्रह लोकांनीं जीवापलीकडे जतन करून राखला. सूतचारणांनीं पुराणें जिवंत ठेवलीं. पण बाकीची स्फुट कविता आस्थेच्या व छापखान्याच्या अभावीं बरीचशी नष्ट झाली असली पाहिजे असें वाटतें. तथापि त्या कवितांची स्मृति पद्यप्रकारांच्या नामवैजयन्तींत थोडीबहुत ताजी राहिली आहे. स्फुट कविता संस्कृतांत नसती तर श्लोक, गाथा, गीत, गीता, स्तोत्र, सुभाषित, अष्टक, अष्टपदी इत्यादि नांवांची उपपत्ति आपण कशी लावणार ? त्या प्रत्येक प्रकाराचे अवशेष ठिकठिकाणीं सांपडतात. छापखाने असते तर जगन्नाथरायांच्या भामिनी-विलासांतील विलापाप्रमाणें अनेक भावगीतें आज उपलब्ध झालीं असतीं. तो विलाप लुप्त होण्यापूर्वी छापखान्यांनीं राखला असेंच म्हणणें प्राप्त आहे. जगन्नाथरायांप्रमाणें भास, कालिदास, भारवि, भवभूति यांनीं स्फुट काव्यें रचिलींच नसतील हें माझ्या तरी मनाला पटत नाहीं. एक उत्कृष्ट नमुना म्हणून ऋतुसंहार तेवढें मागें राहिलें असेल. पण ज्यांच्याकडून भोजप्रबंधांत प्रासंगिक कवितांची कसरत करून दाखविली आहे, त्या "आवेशिक" कवींच्या हातून प्रसंगवशात् उत्कट भावकाव्यें लिहिलीं गेलीं नसतील हें संभवतें तरी कसें ? एवढें मात्र खरें कीं, संस्कृत काव्याची दोन दिशांनीं विशेष प्रगति झाली. सर्गबंधांत कविता बांधून टाकली कीं तिचा अपहार होत नाहीं, या कल्पनेनें कवींचा कल तिकडे अधिक वळूं लागला. त्याजबरोबर, स्मृतिसुलभ सुटसुटित सुभाषितें खुर्द्याच्या नाण्यांप्रमाणें लोकांत सदैव खेळत राहातात असा अनुभव आल्यामुळें त्यांची टांकसाळ सारखी चालूच

राहिली. त्यांतसुद्धां शिक्का कुणाचा हें ठरविणें आज पुष्कळदां कठीण जातें. याशिवाय, धार्मिक कार्याप्रीत्यर्थ नित्याच्या पाठांत ठेवलेली स्फुट कविता खेरीज करून, बाकीची बरीचशी कालांतरानें नष्ट झाली असली पाहिजे. याप्रमाणें संस्कृत स्फुट प्रासंगिक काव्याची सरस्वती जरी लुप्तप्राय झाल्यासारखी वाटली, तरी ती अस्तित्वांत खास होती इतकी ग्वाही खचित देतां येईल.

## ३

मराठी प्रासंगिक "सारस्वताची" बागाईत, या संस्कृत सरस्वतीपेक्षां प्राकृत लोकगंगेच्या पाटवणीनेंच विशेष फोफावली आहे. जनमनोभूमींतील जीवनाचा ठिकठिकाणीं ठाव घेणाऱ्या डुरेमोटांनीं ही बागाईत आतांपर्यंत जगविली. रसाळ भावगीतांचा खरा उगम बहुजनसमाजाच्या भावनेंत आणि भाषेंत असतो असा सर्व राष्ट्रांचा सारखाच अनुभव आहे. म्हणून संस्कृत परंपरेचा विचार करतांना समकालीन प्राकृत प्रासंगिक कवितांचा विसर पडूं देतां कामा नये. असल्या अभिजात संस्कृत कवितेबरोबरच प्राकृत कवितेचाही सारखा विस्तार वाढत होता असें अनुमान काढण्याइतकी माहिती उपलब्ध आहे. संस्कृत नाटकांतून खऱ्या भावनाभिनिवेशाच्या समयीं सूचक व पोषक प्राकृत गीतें घातलेलीं असतात. भावनेच्या, विशेषतः प्रेमाच्या, नाजूक छटा लोकचरितांतसुद्धां प्राकृत गीतांतून गुंफिल्या जात असत हें यावरून उघड होतें. नृत्य तर प्राकृत गीतांच्याच तालावर चालत असे. विक्रमोर्वशीयाच्या चवथ्या अंकांत कालिदासानें असल्या गीतांचा एक कुशल नाच योजिला आहे. ही परंपरा आम्ही इतकी विसरलों कीं कांहीं पंडित या गीतांना प्रक्षिप्त मानतात! पण टीकाकार रंगनाथ यास तीं तशीं वाटलीं नाहींत. इतकेंच नव्हे, तर इसवी सनाच्या दहाव्या शतकांत प्राकृत छंदावरील स्वयंभूछंद हा ग्रंथ लिहिणाऱ्या स्वयंभूला हीं गीतें कालिदासाचीं म्हणूनच अवगत होतीं.[९] त्याच्यापूर्वी प्राचीन कालीं नाट्यशास्त्राच्या बत्तिसाव्या अध्यायांत गेय वृत्तांचा विचार करतांना भरतानें याच प्रकारचीं फक्त प्राकृत गीतें उदाहरणांदाखल घातलीं आहेत. खुद्द स्वयंभूनें पुष्कळ प्राकृत कवींचीं भावगीतें उद्धृत केलीं आहेत. तीं स्वतंत्र व स्फुट दिसतात. त्यांतील बरीचशीं प्रेमगीतें आहेत. खेड्यांतील सृष्टीचें चित्रण करणारीं सुंदर गीतें त्यांत सांपडतात.[१०] हीं गीतें पंडितकवींनीं

रचिलेलीं नसून जातिवंत लोककवींनीं गायिलेलीं असावींत असें वाटतें. दोन कवयित्रींचाही त्यांत समावेश झाला आहे. अशाच प्रकारचा, पण केवळ गाथांचा, एक संग्रह हालाच्या नांवानें सुप्रसिद्धच आहे. त्या संग्रहाच्या आरंभींच "सात शतें कोटींतिल हालें कोशांत येथ सांठविलीं"[११] असें म्हटलें आहे; त्यावरून प्राकृत गाथांचा विस्तार किती विपुल होता हें उघड होतें. प्रेमाच्या जीवनांत प्राकृत गीतांना कोणतें स्थान होतें हें सप्तशतींतल्या दुसऱ्याच गाथेंत मोठ्या मार्मिकतेनें वर्णिलें आहे. "अमृत प्राकृत कविता पठण–श्रवणें तिच्या न जो साजे। कामाच्या तत्त्वांची चिंता करितां कसा न तो लाजे ? ॥"[१२] सातवाहनानें हा संग्रह "अग्राम्य" केला, या बाणभट्टाच्या स्तुतीनेंच या अमृताची मोहिनी ग्रामीण होती हें स्पष्ट होतें.

## ४

प्राकृताची ही परंपरा मराठी काव्यांत अबाधित राहिली. मराठींतील विपुल भावकाव्य ओव्या, अभंग, पदें, लावण्या, पोवाडे, यांतच सारें सामावलें आहे. हे सर्व पद्यप्रकार प्राकृत परंपरेच्या द्वारेंच मराठींत रूढ झाले हें प्रोफेसर वेलणकरांचें मत[३] मी ग्राह्य मानतों. तालयमकादि मायेचे सौभाग्यालंकार या मराठी लेकीनें कधींच सोडले नाहींत. मराठी स्फुट भावकवितेची केवळ वेषभूषाच नव्हे, तर अंतरंग सुद्धां विशेषसें पालटलें नाहीं. महाकवि डान्टेच्या मताप्रमाणें काव्याचे मुख्य विषय तीनच संभवतात. ते म्हणजे: सर्ग–स्थिति–प्रलय या विश्वसंसाराच्या तीन सारभूत तत्त्वांनां अनुसरणारे प्रेम, धर्म, आणि संग्राम हे होत.[१४] या तीनही विषयांवर पूर्वीपासून मराठींत उदंड स्फुट कविता रचली गेली आहे. मराठी वीरांच्या पराक्रमाचा सारा प्रांत पोवाड्यांनीं आक्रमून टाकला आहे. शाहीरांनीं कोणता रोमहर्षण प्रसंग रंगवून जगजाहीर केला नाहीं ? प्रेमाच्या साम्राज्यांत तर लावणीकार नेहेमीच शृंगाराची खंडणी वसूल करीत आले आहेत. लावण्यांतील कंदर्पाचा उग्र दर्प सहन न झाल्यामुळें सोवळे लोक नाकें मुरडतात खरे; पण आमच्या मराठी मर्दांच्या रुचीला आणि प्रकृतीला लसणाचें तिखट चांगलेंच मानवत असावें. लावणीच्या फाजील चेष्टांचा वीट आल्यामुळें रसिक तिच्या खऱ्या लावण्याकडे दुर्लक्ष करतात. पण "आज का गे काग बोलतो

घरावरी" [१५] यासारखें शुद्ध भावगीत आजसुद्धां फारच थोडे कवि लिहूं शकतील. "कविता इजसंगें रंगा आली" अशी बयाबाईची कृतज्ञतापूर्वक प्रीति गाणारा रामजोशी खासगी भावनांची गीतें गाणाऱ्यांचा अग्रणीच समजला पाहिजे. पोवाडे आणि लावण्या यांच्या तालाचा ठेका लोकांच्या नाडीबरोबर पडावयाचा; डफ-संबळाच्या लयांत कवि आणि श्रोते यांचीं हृदयें विलीन व्हावयाचीं. उत्तम भावगीताची ही परा गति समजली जाते. लावण्यांचा वरचा साज अलीकडे आम्हांस आवडूं लागला आहे. गडकऱ्यांच्या काळापासून ती एक "फॅशन्" होऊं पाहात आहे. पण साजाबरोबर साळूची मराठमोळ्याची चाल अजून भावगीतानें उचललेली नाहीं!

संग्राम आणि प्रेम लोककवींना, आणि धर्म संतकवींना, अशी विषम वांटणी जरी मराठी वाङ्मयांत झाली नसली, तरी अभिजात मराठी कवींच्या, आणि विशेषतः संतकवींच्या, स्फुट कवितांचे मुख्य विषय नीति, भक्ति, आणि मुक्ति हेच होते. नीतिपर कविता लावणीकारांनींही क्वचित्प्रसंगीं लिहिली आहे; आणि रामदासस्वामी सोडले तर इतर संत आणि पंडित कवींना राधा-कृष्णाच्या शृंगारांत जीवा-शिवाची भेट साध्य होत असे. "वारियानें कुंडल हाले। डोळे मोडित राधा चाले" हें एकनाथांचें कडवें कोंकणांत धमणीच्या गाडीवानाला गातांना मी ऐकिलें आहे! अभिजात कवींनीं सभोंवतालच्या संसारांतील इतर विषयांवरही स्फुट कविता रचिली असावी. पण वर उल्लेखिलेल्या कारणांस्तव आज ती उपलब्ध नाहीं. नाहीं म्हणावयास ज्यांचा संप्रदाय अधिक दक्ष, निष्ठावान्, आणि कार्यक्षम त्या रामदासांच्या मात्र मुबलक स्फुट कविता वाचावयास मिळतात. कधीं कधीं त्यांतून अत्यंत आधुनिक ध्वनि निघतो. परशुरामक्षेत्रीं गेल्याबरोबर या जमदग्नि गोत्रांतील ब्राह्मणाच्या मुखावाटे सहज उद्गार निघाले कीं "किती एक मागें बहू युद्ध केलें। किती वेळ या ब्राह्मणा राज्य दिल्हें। अकस्मात सामर्थ्य तें काय झालें। युगासारिखें काय नेणों विझालें॥" [१६] सृष्टिसुंदरीचीं स्तोत्रें रचण्याची कला आंग्लशिक्षित कवि कदाचित् वर्डस्वर्थकडून शिकले असतील. पण त्यापूर्वीच घळींत सदैव वास करून सह्याद्रीच्या सृष्टीशीं समरस झालेल्या रामदासांना तेथील वर्षाकालीन वनश्री पाहून "वरदराज विराजतसे वनीं" असा आभास झाला; व "सुख मनीं सुमनीं मन रातलें" [१७] अशी प्रसन्न स्थिति

प्राप्त झाली. "वृक्ष-वल्ली आम्हां सोयरीं वनचरें"[१८] या अभंगांत तुकारामाची सृष्टीशीं लागलेली समाधि माझ्या पाहाण्यांत इतरत्र कुठेंच आली नाहीं. वाल्मीकीच्या शोकांतून जसा श्लोक, तद्वत् भंग न पावणाऱ्या भावनासमाधींतून अभंग हा छंद मराठींत अवतरला असें म्हणावेंसें वाटतें. अभंगांत कितीतरी प्रासंगिक भावगीतें गुंफिलीं गेलीं आहेत. "तूं मायेहुनी मवाळ" आणि "मी अवगुणी अन्यायी" यांसारखीं हृदय विरघळून टाकणारीं गीतें जगाच्या वाङ्मयांत फारच थोडीं असतील.[१९] विराणीच्या अभंगांपुढें टागोरांचें गूढगुंजन कर्कश वाटेल कदाचित्! आणि आज युद्धामुळें मानवजातीच्या यातनांनीं जाचलेला जातिवंत कवि "भीत नाहीं मी आपुल्या मरणा। दुःखी होतां जनां न देखवे ॥"[२०] याशिवाय दुसरे काय उद्गार काढील?

अभंगांइतकाच, किंबहुना त्याहीपेक्षां अधिक मोठा, प्रासंगिक कवितेचा सांठा पदपदांतरांत आहे. ताल आणि स्वर, काव्य आणि संगीत, यांचा मधुर मिलाफ घडून आल्यामुळें अभंगांपेक्षां पदें हीच आमची खरी गीत–संपत्ति होय. बरीचशीं पदें परमेश्वरप्रवण असल्यामुळें आम्ही आज त्यांपासून पराङ्मुख होतों. पण भावकाव्यांत पदांचें अढळ पद आहे हें आम्हांस पदोपदीं कबूल करावें लागेल. कीर्तनाचा रंग संपतांच तीं देवळांतून उठून नाटकगृहांत आलीं; आणि आतां त्यांचें सिनेमांत पदार्पण झालेंच आहे. आजकाल आम्हांस नव्या वाटणाऱ्या भावगीतांच्या चाली, आमचीं नवीं मात्रावृत्तें, हीं बहुतांशीं पदें आणि लावण्या यांवरूनच घेतलीं आहेत हें माधवराव पटवर्धनांच्या छंदोरचनेंतील जातिजृम्भण हें प्रकरण वरवर वाचणाऱ्यास देखील सहज कळेल. माझ्या मतें एकनाथ, केशवस्वामी, आणि सोहिरोबा आंब्रिये हे मराठीचे तीन रसाळ व प्रासादिक पदकार होत. "वारियानें कुंडल हाले" या एकनाथाच्या पदाचा मी पूर्वीच उल्लेख केला आहे. "धांव विभो करुणाकर माधव" हा केशवकिंकराचा कर्णमधुर धांवा केवळ नादाच्या जादूनेंच मन भारून टाकितो. आणि "प्राण्या तुझा परिणामीं अति कठिण प्रकार"[२१] या सडेतोड उपदेशाच्या पदानें भरदरबारांत महादजी शिंद्यांच्या केलेल्या कानउघाडणींत सोहिरोबांच्या बेदरकार प्रतिभेची चुणूक दिसेल!

असो. गणवृत्तांत उपलब्ध असलेली थोडीशी कविता वगळली तर अभंग, पदें आणि शाहीरांचीं कवनें, या त्रिपिटकांत सगळी जुनी मराठी प्रासंगिक कविता व गीतें एकत्रित आलीं आहेत.

५

इंग्रेजी अमदानींतील स्फुट "भावगीतांचा" परमात्मा परंपरेच्या या लांबलचक पुराणाच्या मार्गें भेटणार नाहीं असें कांहीं वाचकांस वाटण्याचा संभव आहे. प्रासंगिक भावकविता देशकालाप्रमाणें वाटेल तसा वेष पालटो; ज्ञातास्वाद रसिकाला तिच्या अंतरंगाच्या खाणाखुणा ओळखीच्याच वाटतात. पण अनभिज्ञांकरितां परंपरेचीं प्रावरणें दूर करून आंतील मूर्त सौंदर्याचा परिचय करून देणें हें काव्यविवरणाचें प्रमुख कार्य समजलें जातें. सर्व प्रकारच्या काव्यांत हें सौंदर्य रूपाला कसें येतें इतका व्यापक विचार करण्याची येथें आवश्यकता दिसत नाहीं. तसें पाहूं गेल्यास विविध काव्यनिर्मितीचा व्यापार सर्वसाधारण सारखाच असतो. तथापि ज्याप्रमाणें प्राणिशास्त्राच्या अध्ययनांत सूक्ष्म निरीक्षणाकरितां कांहीं विशिष्ट प्रातिनिधिक नमुने निवडतात, त्याप्रमाणें काव्यनिर्माण-शास्त्र समजून घेण्यास प्रासंगिक भावकाव्याचेंच विश्लेषण अधिक उपयोगाचें वाटतें. अध्यात्माची भाषा वापरावयाची म्हणजे, एकंदरींत काव्य हा स्थूलदेह कल्पिला तर स्फुट भावगीतास लिंगदेह म्हणावें लागेल; त्याचे पंचप्राण कोणते हें जाणल्यानें त्याचें यथार्थज्ञान होईल.

काव्य हा शब्द मी कवित्व-विरोधि अर्थानें योजिला आहे. काव्य आणि कवित्व यांतील फरक सुज्ञ रसिकास समजून सांगावा लागत नाहीं. कालिदास आणि नैषधकर्ता श्रीहर्ष, शेली आणि पोप, तुकाराम आणि मोरोपंत यांतील जो भेद तोच ढोबळमानानें काव्य आणि कवित्व यांतील फरक होय. राजशेखराचीं विशेषणें वापरावयाचीं म्हणजे एक "सारस्वत" कवि तर दुसरे "आभ्यासिक." कवित्व हें केवळ बुद्धीच्या सायासांनीं साध्य होतें असें हे आभ्यासिक कवि समजतात. बुद्धीच्या प्रयत्नचातुर्यानें कवित्व कसें रचावें याचें मार्मिक वर्णन इंग्रेजींतील आभ्यासिक कवींचा मुकुटमणि ड्रायड्न् यानें केलें आहे. तो म्हणतो : "प्रथम शोधक बुद्धीनें कोणतातरी विचार धुंडाळावा लागतो. मग कल्पक बुद्धीनें विषयाला अनुरूप अशी त्या विचाराची मांडणी

करावयाची. शेवटीं कलात्मक बुद्धीनें त्या विचारावर नीटनेटकीं शोभिवंत शब्दांचीं प्रावरणें चढवावयाचीं." [२२] या त्रैराशिकानें कवित्वाच्या यांत्रिक खटाटोपाचें गणित सहज सुटतें ! हाटांतून एकादी नीटस बाहुली शोधून आणून, तिला थोडीशी घांसून पुसून, भरजरी वस्त्रांनीं नटवून "कविताकामिनी" म्हणून लोकांच्या "कौतुकाय" पुढें करावयाची, हा झाला कवित्वाचा व्यापार. त्याच्या उलट, खरें काव्य जिवंत सौंदर्याला जन्मास घालतें. ती यांत्रिक घटना नव्हे ; तें एक अतर्क्य कोडें आहे. गणिताच्या सिद्धांतानें तें उलगडत नाहीं. "खरें काव्य गर्भांतील बालकाप्रमाणें वाढतें व जन्माला येतें. त्याच्याभोंवती उल्बाचें इतकें गूढ आवरण असतें कीं, त्याचें आधान कधीं व कसें झालें, व तें कोणत्या प्रकारें पूर्णता पावलें, हें खुद्द कवीलाच कळत नाहीं." शेलीच्यां [२३] या शरणागतीच्या कबुलीवर कुणीही तर्कट अधिक प्रकाश पाडूं शकणार नाहीं !

हें जरी खरें असलें, तरी कविमनाच्या प्रयोगशाळेंत डोकावून काव्याचा प्रयोग कसा होतो याची माहिती करून घेण्याचें कुतूहल सर्वांस असावें हें अगदीं स्वाभाविक होय. त्या प्रयोगाचें पृथक्करण करून त्याच्या घटकांची चर्चा करण्याचें धाडस मी आतां करणार आहें. पण माझ्या पुढील वर्णनांत सर्वच घटकांचा सारखा समावेश झाला आहे, किंवा याच क्रमानें ते मिसळल्यानें काव्याचें रसायन हमखास तयार होतें, असा आग्रह नाहीं ; व कोणाही समंजस चिकित्सकानें असा ग्रह करून घेऊं नये. या अज्ञात प्रदेशाच्या केवळ स्थूल रूपेरखांचाच आराखडा मला देतां येईल. निश्चित खाणाखुणांचा नकाशा तयार करणें मला साधणार नाहीं. ज्यांनीं काव्याचें कैलासशिखर गांठलें होतें अशांनीं लिहून ठेवलेल्या आठवणींवरच माझें हें काव्य-यात्रा-वर्णन आधारलें आहे ; क्वचित् कांहीं टप्पे स्वानुभवाशीं पडताळून मुक्रर केले असतील.

## ६

माझा काव्यप्रयोगाचा सिद्धांत एकाच वाक्यांत आरंभीं नमूद करतों. प्रचीति, प्रक्षोभ, प्रसाद, प्रतिभा आणि प्रयत्न हे काव्याचे, आणि विशेषेंकरून भाव-काव्याचे, पंचप्राण होत. काव्यनिर्मितीचा सारा प्रपंच या पंचकांत सांठविला आहे. या पंचीकरणाचा आतां अधिक बारकाईनें पिच्छा पुरविला पाहिजे.

प्रचीतीशिवाय खऱ्या काव्याला स्फूर्तीच मिळावयाची नाहीं. प्रचीति म्हणजे आत्मसात् झालेला स्वानुभव. नव्या नव्या अनुभवांचें स्वागत करण्यासाठीं कविमनाचीं दारें नेहेमी खुलीं पाहिजेत. कित्येकांच्या नाजूक प्रकृतीला बाहेरची स्वच्छ हवा सोसत नाहीं. ते दारें-खिडक्या बंद करून आंतल्या कोंदट, दूषित हवेंतच बसतात. त्यांच्या कविता कुजट वाटल्या तर कांहींच नवल नाहीं. दुसऱ्या कांहींना रविवर्म्याच्या चित्रांतील विश्वामित्राप्रमाणें नव्या गोंडस अनुभवाकडे पाहाण्याचें धैर्य नसल्यामुळें डोळयांवर हात ठेवावा लागतो, आणि म्हणून ते प्रज्ञाचक्षु देखील न राहिल्यानें त्यांची कविता केवळ अंधानुकरण करीत असते. प्रचीति विविध पाहिजे असेल तर कवीचें मन "पाणी तेरा रंग कैसा, जिसमें मिलावे वैसा" याच वृत्तीचें असलें पाहिजे. खऱ्या कवीला स्वतःचा असा आत्मा नसतोच; तो जें अनुभवील तदाकार होऊन तादात्म्य पावतो.[२४] या वृत्तीच्या कवीचें मन म्हणजे अनुभवांची धर्मशाळाच होय. त्या अनुभवांचें वास्तव्य क्षणिक कां असेना, त्या प्रवाश्यांनीं कुठेंतरी कोनाकोपऱ्यांत आपली सही किंवा स्मृतिचिह्न कोरून ठेवलें पाहिजे. या अभिज्ञानाचें कवीला उघड ज्ञान नसेल कदाचित् ; त्याच्या नकळत तें सौहृद, ती मैत्री भावस्थिर झाली असेल. पण वेळ आली कीं "जाणीवेच्या पूर्वी चित्तीं जागे तिची स्मृती साच."[२५] आणि त्यांतूनच मग काव्य स्फुरतें. सारांश, अनुभव पचनीं पडून रक्तांत खेळला पाहिजे; मग तो स्वतःच्या खासगत सुखदुःखांतून आलेला असो, अथवा इतरेजनांचा, बहुजनांचा, मूक प्राण्यांचा, वृक्षवेलींचा, यच्चयावत् सृष्टीचा, पण आपलासा करून घेतलेला असो. कोणतीहि कविता "प्रतीतिसुभगं वचः"[२६] या कसोटीला आधीं उतरली पाहिजे. अनुभव आपलासा झाला नसतां, स्वानुभव होऊन कविमनांत संचरला नसतां, जर काव्यांत अवतरला तर कलेच्या दृष्टीनें तो खचित कंटाळवाणा, आणि क्वचित् किळसवाणासुद्धां होतो; मग तो बुद्धीच्या अगर भावनेच्या द्वारा कसाही घेतलेला असो. प्रचीतीविण जें बोलणें त्याला रामदासांनीं वमनाची योग्य उपमा दिली आहे. "प्रचीतीविण जें बोलणें। तें अवघेंचि कंटाळवाणें। तोंड पसरून जैसें सुणें। रडोन गेलें" हे त्यांचे उद्गार[२७] आम्ही नित्य मनन करावेत. अनुभव उसना असेल तर कविता नकली व्हावयाची हा सिद्धांत ठरलेलाच. तुकारामाची तळमळ अंगीं

नसतांना भक्तीची काव्यें लिहूं गेल्यास तीं भाडोत्री वाटतील; आणि म्हणूनच सामान्य वाचक गूढगुंजनाविषयीं बराच साशंक असतो. भक्तीप्रमाणें इतर कोणत्याही भावनेची उसनवारी करून ती व्याजानें लावण्याचा धंदा अंतीं पोकळच राहाणार. आणि बौद्धिक उसनवारींत तर बेगडीच्या रंगाचें सोंग चटकन् ओळखतां येतें. स्वातंत्र्याचे किंवा समतेचे कोणतेही राजकीय किंवा सामाजिक विचार घ्या, त्यांचें आणि कवीच्या आचाराचें अद्वैत साधल्याशिवाय, त्यांनीं कवीच्या भावना पूर्ण भारून टाकल्याशिवाय, पचनीं पडून पुष्टि दिल्याशिवाय, त्यांच्या लावण्याची कांति आणि तेज काव्यांत कुठून येणार? व्यक्ति या नात्यानें विचारांची प्रचीति घेतल्यावांचून कवीनें ते काव्यनिर्मितींत सामील करून घेऊं नयेत.[२८] नाहींतर तें कवित्व म्हणजे नुसती प्रचारकी पोपटपंचीच वाटेल. प्रचारासाठीं वाचकांशीं भांडतानां वाद उपस्थित होतील; परंतु आपलाचि वाद आपणाशीं झाल्याशिवाय काव्य निर्माण होणार नाहीं. विचार अगदीं शुद्ध सोन्याचे असतील; पण त्यांचें नाणें खणखणित वाजलें पाहिजे तर त्यांत स्वतःच्या भावनांचें मिश्रण अवश्य हवें, आणि व्यक्तित्वाचा शिक्काही हवा. सारांश, सुकविता ही प्रचीतीच्या मजबूत पायावर आधारली नसेल तर चिरस्थायी होणार नाहीं. ती जीवनाच्या खऱ्या प्रसंगांतून उद्भवलेली म्हणूनच प्रासंगिक असावी. केवळ हवेंत तरंगणाऱ्या तात्कालीन निःसंग कल्पनांची किंवा भावनांची ती मोट नसावी.[२९]

तसेंच, कविता प्रचीतिसुभग व्हावयाची असेल तर ती प्रचीति केवळ एका व्यक्तीच्या आकुंचित जीवनापुरती मर्यादित आणि अत एव क्षुल्लक नसावी. ती कल्पनेची असो वा भावनेची असो, बहुतांस तींत जितके जास्त सहभागी होतां येईल तितकी कविता अधिकाधिक सुभग. खासगी अनुभव खरा असतो, आपणास तो मोठा वाटतो, म्हणूनच केवळ त्याला काव्यांत स्थान देतां कामा नये. तो सूचक असेल, इतरांचाही निदर्शक असेल, तरच त्याला काव्यांत महत्त्व प्राप्त होतें.[३०] व्यक्तिस्वातंत्र्याच्या या युगांत विशेषतः तरुण कवीला "अहं ब्रह्मास्मि"ची भावना होणें अगदीं साहजिक आहे; व मग त्याची "काव्यीं दिसे आपण" (काव्ये स्वतां पश्यति) अशी स्थिति झाल्यास नवल काय! पण आपल्या खिशांतल्या आरशांत मुखडा न्याहाळीत

तो जीं स्वगत भाषणें[३०] करतो त्यांची गोडी इतरांस कशी कळावी ? तीं त्याच्याच घरीं घुटमळत राहातील; कदाचित् ज्या जानीदोस्तांना त्याच्या सांकेतिक भाषेची गोम अवगत असेल त्यांच्या घरापर्यंत तीं पोंचतील. पण फक्त स्वतःच्या खासगत भावना बोलून दाखवितो तो कवि नव्हे; इतरांच्या, विश्वाच्या भावना आपल्याशा करून रंगवितो तो खरा कवि. कवि हा केंव्हांही काव्याचा मध्यबिंदु कल्पिला पाहिजे; पण त्याच्या अहंकाराच्या छोट्या वर्तुळाचा विश्वाच्या मोठ्या विशाल वर्तुळाशीं संपर्कच होत नसेल,[३१] तो जर स्वतःच्याच चक्रव्यूहांत गोंधळत राहात असेल, तर त्याच्या काव्याचा अंतीं नाश हा ठरलेलाच. अनेकांची कविता तारुण्यानंतर आटते याचें हेंच निदान. खासगी अनुभवाचें तुटपुंजें भांडवल संपलें म्हणजे नुसती पोकळ ऐट शिल्लक राहाते. उलट, ज्याच्या प्रचीतीचा व्याप सारखा वाढतच जातो त्याच्या काव्यव्यापाराला कधींच तूट येत नाहीं. त्याचीच प्रतिभा नवनवोन्मेषशालिनी, व त्याच्याच काव्याविषयीं असें म्हणतां येईल कीं: "न्यस्याविदग्धवदनेषु पदानि शश्वत् तस्यैव संचरति विश्वकुतूहलीव"[३२] (अडाण्यांच्या तोंडीं सतत अपुलीं ठेवुन पदें। कुणा एकाद्याची जगतिं कविता हिंडत मुदें ॥). वर्तमानाचे क्षणक्षणा पालटणारे रंग प्रासंगिक कवितेचें अंतरंग व्यापून टाकतात; म्हणून आधुनिक काळांत विविध प्रासंगिक कविता लिहिणारा कवि जितका सर्वांगीण असेल तितका अधिक प्रभावी होईल. तरुण पिढींतील इंग्रेजी कवि मॅक्नीस आपणाला कसला कवि हवा याचें मार्मिक वर्णन करतांना म्हणतो[३३] कीं, तो शरीरानें धडधाकट असावा; त्याला संभाषणाची आवड असावी; तो वर्तमानपत्रें वाचणारा, करुणाक्षम, विनोदप्रिय, अर्थशास्त्र जाणणारा, स्त्रीरहस्य ओळखणारा, खासगी ऋणानुबंधांत गुंतलेला, राजकारणांत खास लक्ष घालणारा, इंद्रियांच्या साऱ्या संवेदना अनुभविणारा-असा असावा. सेसिल डे लेविसनें अशा कवीला "वायर्लेस् स्टेशन"ची उपमा दिली आहे.[३४] त्याचे मोठमोठे खांब जमिनींत बद्धमूल असले तरी स्वर्गाप्रत पसरलेले असतात. वातावरणांत तरंगणारे सारे संदेश प्रथम समजून घेऊन, त्यांची योग्य निवड व उचित मांडणी करून जगाच्या भाषेंत मग ते सर्वांकरितां फैलाविले जातात. जितक्या विस्तीर्ण आकाश-प्रांतांतील संदेश यंत्रास घेतां

येतील तितका तो मोठा कवि. " इदमेव तत्कवित्वं यद्वाचः सर्वतोदिक्काः। "[३५] ( तेंच कवित्वाचि वाणी बिनदिक्कत जैं फिरे दिशा साऱ्या ).

व्यापक प्रचीतीची उणीव विषयांच्या किंवा भावनांच्या नावीन्यानें भरून काढतां येते असा नवख्या कवींस विश्वास वाटतो. फुलें-मुलें, यामिनी-कामिनी, इत्यादिकांकडे पाठ फिरवून नव्या विषयांच्या विचित्र लीलेच्या ते मागें लागतात. तसें पाहातां काव्यवस्तूंत जो सारखेपणा भासतो त्याचीं कारणें उघड आहेत. माणसाच्या डोळयांपुढें वावरणाऱ्या जगांतील बऱ्याचशा वस्तु सनातन आणि नित्यच आहेत. "ध्रुवा द्यौर्ध्रुवा पृथिवी ध्रुवासः पर्वता इमे। ध्रुवं विश्वमिदं जगत्।."[३६] अर्थात् काव्यांतही त्यांचें स्थान ध्रुवच राहाणार. मानवी जीवनांत जिव्हाळयाच्या संबंधांची भाषा बदलत नाहीं; काव्यप्रबंधांत तरी ती कां बदलावी? तथापि हें मात्र खरें कीं, काव्यवस्तु कांहींही असो, कवीला तद्विषयक जी प्रचीति आली तोच खरा काव्याचा विषय. " विदग्धभणितिभंगि-निवेद्यं वस्तुनो रूपं न नियतस्वभावम्।"[३७] हें विदग्ध अवन्तिसुंदरीचें मत तिच्या पतीस-राजशेखरासच काय, सर्वांसच मान्य होईल. विषय कितीही विलक्षण असला तरी त्यांतून स्फुरण पावणारी भावना अगदीं सामान्य असूं शकते. मलेरियाचा जंतु हा काव्यांत उमटेल असें सहसा कोणास वाटणार नाहीं. पण तो शोधून काढला या आनंदाच्या भरांत रॉसनें जी कविता गाइली तींत " दयार्द्र देवें माझ्या हातीं नवलाची ही चीज दिली! "[३८] या आश्चर्याच्या ओळखीच्याच भावनेवर भर दिला. अलीकडे आगगाड्या काव्यांतून धांवतांना आढळतात; व विमानें देखील काव्य-व्योमांत उड्डाणें करूं लागलीं आहेत. आगगाड्यांच्या संचाराचे नियमित ठेके वेळापत्रकाच्या गद्यांत सांपडतील; पण उद्दामांच्या जुलमाचा दुर्बळांकडून सूड कसा घेतला जातो या जुन्याच इतिहासाचें काव्य कुसुमाग्रजांनीं आपल्या " आगगाडी व जमीन "[३९] या कवितेंत आम्हांस दिलें. संस्कृत साहित्यांत रसांचें जें वर्गीकरण केलें गेलें त्याचें प्रयोजन बहुधा हेंच असावें कीं, विषय कांहीही असला तरी सिद्ध होणारा रस बहुधा नवीन नसतो; व तो मात्र प्रचीतींतूनच सिद्ध होतो. नव्या विषयांच्या, नव्या भासणाऱ्या भावनांच्या आकर्षक आभासानें जरी कोणाच्या कवितेनें क्षणिक भुरळ पाडली, खोटा बहाणा करून कांचनमृगाप्रमाणें नादास लावलें, तरी अंतीं तिचें सत्य स्वरूप समजतां आपली निराशाच होईल. नावीन्याचा

छंद घेऊन लोकविलक्षण भावना हुडकून काढणें किंवा जगाच्या तापांतून मुक्त होण्याकरतां स्वतःचें असें एक हिमगृह निर्माण करून त्यांतच कादंबरीप्रमाणें वावरणें हें खऱ्या कवीचें कार्य नसून साध्याच विषयांतला नवा आशय सांगणें हेंच त्याचें कार्य होय. हें तत्त्व सतराशें वर्षांपूर्वीच्या लॉंजायनस्पासून विद्यमान इंग्रज कविश्रेष्ठ एलिअट्पर्यंत सर्व साहित्यकार सारखेंच सांगत आले आहेत[४०] !

प्रचीतीच्या या लांबलेल्या चर्चेचा निष्कर्ष शेलीच्या एकाच वाक्यांत सांगतां येईल; तो असा:[४१] "कविता म्हणजे सनातन सत्याच्या द्वारा दाखविलेलें जीवनाचें प्रतिबिंब."

नुसत्या प्रचीतीनें काव्यसिद्धि होत नाहीं. जलाशयाप्रमाणें शांत राहाणाऱ्या कविमनांत जीवनाचें प्रतिबिंब पडून कार्यभाग साधत नाहीं. त्यापेक्षां अनुरूप उपमा म्हणजे ही कीं, अशा जलाशयांत अंतर्यामाचा ठाव घेणारा आघात झाला तर साहजिकच तरंगचक्र सुरू होतें; आणि विश्वाच्या तीरावर त्या तरंगलहरी आदळूं लागल्या कीं जो मधुर निनाद स्फुरतो तें खरें काव्य! आघात सारखा चालू असतां, व्यक्ति घुसळून निघत असतां, मंथन होत असतां, जें अमृत निर्माण होतें तेंच प्रासंगिक भावकाव्य म्हणावें. त्याजबरोबर अमृत वाढणारी मोहिनीसुद्धां हजर होतेच! प्रचीति होत असतांनाच प्रक्षोभ अनावर होतो हा प्रासंगिक काव्याचा प्रसिद्ध विशेष होय. निर्मितीचा प्रक्षोभ बाकी सर्व प्रकारच्या काव्यांत, सर्व कलाकृतींत, असावाच लागतो.[४२] पण प्रचीतीचा आणि निर्मितीचा प्रक्षोभ उत्तम भावकाव्यांत एकसमयावच्छेदेंच होतो. या प्रक्षोभाचे कवीच्या शरीरावरही तत्क्षणीं परिणाम होतात असे कांहीं दाखले सांपडतात. श्यामिलकानें पादताडितकांत म्हणल्याप्रमाणें "कवेर्भवति श्रमः सनयनजलो रोमोद्भेदः." अलीकडेच दिवंगत झालेल्या ए. ई. हाउसमननें[४३] या इंग्रेजी कवीनें आपल्या एका भाषणांत खालील मजेदार वर्णन केलें होतें: "सकाळीं काव्यकल्पनांचा उल्हास मनांत डोकावूं लागला म्हणजे दाढी करतांना माझे केस ताठ उभे राहात असत; नेत्रांत अश्रु सांठत असत; अंगावर कांटा उभा राहात असे; व छातींत कट्यार खुपसल्यासारखी कळ येत असे!" ज्यिआकोमो या इटालिअन् कवीच्या शुद्ध काव्यावर मोहित झालेल्या क्रोचे या प्रख्यात टीकाकारानें त्या कवीचा अनुभव याच

प्रकारचा असल्याचें नमूद केलें आहे. त्याला काव्यस्फूर्तिसमयीं पोटांत मनस्वी दुखत असे.[४४]

भावकाव्यांतील प्रक्षोभाचें स्थान प्रेमगीतांवरून स्पष्ट होईल. काम ही मानवी जीवनांतली अत्यंत प्रक्षोभकारक शक्ति असल्यामुळें "कामोपचारबहुलं हि वस्तु काव्यस्य"[४५] ही तक्रार कायमच राहाणार. तरुणपणीं कामाच्या भावनेनें प्रक्षोभ अनावर व्हावा हें अगदीं साहजिकच आहे; आणि म्हणूनच तारुण्यांत शृंगारिक कवितांचें पीक रगड. पण त्या भावनेचा एकदां संसारांत मेळ बसला म्हणजे तद्भव प्रक्षोभाला वावच राहात नाहीं. पुढेंपुढें जलाशयावर संसाराचा इतर शेवाळ इतका दाटतो कीं, मोठेथोरले फत्तर आंत फेंकले गेले तरी तरंगच स्फुरत नाहींत अशी कठिण स्थिति होते; व नवी प्रचीति झालीच तर ती एकदम बुडाशीं गाडलीच जाते. विविध प्रचीतींच्या नाजुकशा आघातानें प्रकंप पावेल इतकी आंदोलनक्षम ज्याच्या मनाची तार, न उतरतां, सारखी लाविली गेली असेल तोच अखंड काव्यनिनाद घुमवील. धरणीकंप दर्शविणाऱ्या सुईच्या कांट्याप्रमाणें दूरच्या साध्या कंपानेंसुद्धां त्याचें हळवें मन हलावें लागतें.

प्रक्षोभांतूनच काव्य स्फुरतें खरें, पण मन प्रसाद पावल्याशिवाय तें प्रत्यक्ष निर्माण होणार नाहीं. प्रसाद म्हणजे प्रक्षोभाच्या वादळानंतर येणारी शांति, वर्षाकालीन गढूळता जाऊन येणारी शरदाची प्रसन्नता. त्या अवस्थेंत बुद्धि स्थित होऊन सर्वच विमल दिसतें; अनुभविलेल्या रागद्वेषांपलीकडे जाऊन तिऱ्हाइताप्रमाणें त्यांचें चिंतन करतां येतें. "प्रसादे सर्वदुःखानां हानिरस्योपजायते। प्रसन्नचेतसो ह्याशु बुद्धिः पर्यवतिष्ठते॥"[४६] (दुःखें जातीं लया सारीं प्रसाद मनिं नांदतां। प्रसन्न चित्त झालें कीं बुद्धि होते झणिं स्थिर॥). चिंतनानें येणाऱ्या या प्रसन्नावस्थेंत सहज समाधि लागून अनुभविलेले विकार सौंदर्याच्या आकाररूपाला येतात. या स्थितीचें उत्तम प्रतीक ताण्डवनृत्यांत सांपडेल. गजासुराचा संहार करणाऱ्या रुद्रानें, त्याचें आर्द्राजिन पांघरून त्याचें शव पायांखालीं तुडवीत तो नाच केला. त्या नृत्यांत संहार थैमान घालीत नाहीं; तर सुप्त होणाऱ्या प्रक्षोभाची आठवण करून देणारी नवी प्रतिष्ठाच शोभते. संहारांतून शिवाची आणि सौंदर्याची थाटणी होते ती

अशी. याच प्रकारचें वर्णन क्रोचेनें खालील शब्दांत केलें आहे : [४७] विकाराचा उमाळा आणि चिंतनाचा संयम, प्रक्षोभ आणि शांति यांना एकजीव करणें हीच काव्याची खरी जादू. चिंतनाच्या या विजयांत नुकत्याच होऊन गेलेल्या शस्त्रांचा खणखणाट अद्यापि घुमत असतोच! व 'न्यस्तं पदं शिरसि विद्विषताम्' [४८] (कीं रोविलें पद शिरीं रिपुंच्या) हें दृश्य दिसतें. चिंतनानें येणाऱ्या या प्रसादाला, या आंतर प्रयत्नाला, एकाग्रतेला, आमचे साहित्यकार समाधि म्हणतात. खरें सारस्वत काव्य अशा समाधीशिवाय संभवतच नाहीं. "सारस्वतं किमपि तत्सुमहारहस्यम्। यद्गोचरे च विदुषां निपुणैकसेव्यम्। तत्सिद्धये परमयं परमोऽभ्युपायो। यच्चेतसो विदितवेद्यविधेः समाधिः॥" [४९] (सारस्वत तें अतर्क्य त्याचें गूढ रहस्यहि मोठें। विद्वानांच्या कक्षेंत जरी निपुणां केवळ तें भेटे। तें साधाया उपाय एकच मोठा नामी हा ठावा। वेद्याचा विधि कळला ज्या त्या समाधि चित्ताची लावा॥).

प्रक्षोभकाळींच प्रसाद आल्याशिवाय काव्य हें प्रक्षुब्ध मनाचे सहजोद्गार होऊं शकत नाहीं. नुसत्या प्रक्षोभानें काव्यनिष्पत्ति होत नाहीं हें अगदीं खरें; क्वचित् वेडाचा विकृत झटकाहि येण्याचा संभव आहेच. म्हणूनच रागाच्या आवेशांत दिलेल्या शिव्या, किंवा अन्यायाची चीड येऊन केलेले खून इत्यादींची कोणी काव्यांत अथवा कलाकृतींत गणना करीत नाहीं. याचा मात्र असा अर्थ नव्हे कीं कलाकृतींत स्वानुभवैं हा प्राथमिक किंवा सहजस्फूर्त नसतो. साध्यासुध्या कवीस प्रसाद सहजसाध्य असत नाहीं. कांहीं प्रकारच्या आजारांत [५१] इतर चित्तवृत्तींचा निरोध झाला असतां, आंतल्या कप्प्यांत कुठेंतरी दडून बसलेल्या काव्यवस्तूशीं मन युक्त होऊन प्रसन्नावस्था सहज प्राप्त होते; यावरूनच एरवीं प्रक्षोभ आणि प्रसाद यांतील अंतर किती दूर असतें याची यथार्थ कल्पना यावी. प्रसाद प्राप्त होण्यास ज्यांस कष्ट पडतात, विलंब लागतो, त्यांच्या काव्याला, "सुप्त विकारांची भाषा" ही बायरन्‌ची, किंवा "शांत चित्तानें स्मरणोज्जीवित केलेली भावना" ही वर्डस्वर्थची व्याख्या लावतां येईल. प्रक्षोभानंतर, कालांतरानें त्याचा पहिला उमाळा ओसरल्यानंतर, ते भावनेशीं स्वस्थ विलास करून काव्यें निर्माण करतात. पण असें करण्यांत तिचा मूळचा जोम कमी होतो, मूळचा धगधगित वह्नि तसाच पेटत राहात नाहीं, हें त्यांस कबूल करणें प्राप्त आहे. [५२] खऱ्या सारस्वत कवींचें चित्त मात्र भावनेची

भरती पूर्ण होत असतांच समेवर येऊन पोंचतें. रामकृष्ण परमहंसांप्रमाणें प्रश्नोभक्षणींच त्यांची समाधि लागते. सलग्न तुर्यावस्थेंतच त्यांचें मन रंगतें. ते अनुभवाची प्रचीति घेत असतांनाच कांसवासारखीं अंगें आंत ओढून तिऱ्हाइताच्या दृष्टीनें आपल्या भावनांकडे बघतात. भावनांचे रंग पालटत असतांनाच चित्र चितारूं लागतात. बुद्धीचे तरंग उसळत असतांनाच त्यांत स्वस्थ विहार करतात. म्हणूनच आलेल्या प्रचीतींतील "मम"तेचे पाश तोडून ते स्वतः मुक्त होतांना त्यांच्या मुखावाटे निघणाऱ्या सहजोद्गारांनीं इतरांचीही आत्मस्थिति ते सांडवूं शकतात.

असे सहजोद्गार निघण्यास प्रतिभेचा पूर्ण वरदहस्त पाहिजे. काव्याच्या प्रमेयाचें आकलन करणें हें आधीं असाध्यच; परंतु काव्यनिर्मितिप्रकरणांत सर्वांत जर कांहीं अप्रमेय असेल तर प्रतिभा. प्रतिभेलाच कित्येकांनीं शक्ति हें दुसरें नांव दिलें आहे. "प्रतिभासयति सा प्रतिभा" या धात्वर्थवाचक उघड व्याख्येपेक्षां रुद्रटानें शक्तीची म्हणजेच प्रतिभेची दिलेली काव्यालंकारी व्याख्या मला पसंत आहे; कारण ती माझ्या मागील विवेचनाशीं जुळती आहे. ती अशीः—"[५३]मनसि सदा सुसमाधिनि विस्फुरणमनेकधाभिधेयस्य। अक्लिष्टानि पदानि च विभान्ति यस्यामसौ शक्तिः॥" (मनहि सदा सुसमाधिंत असतें, स्फुरती विचार नित्य नवे। अक्लिष्ट पदें साक्षात् दिसती, प्रतिभा तिलाच कीं म्हणवे॥). समाधीशिवाय प्रतिभेची स्फूर्ति होत नाहीं हें या व्याख्येंत गृहीतच धरलें आहे. या व्याख्येवर टीका करतांना "झगित्येव पदानि प्रतिभान्ति" अशी नमिसाधूनें टिप्पणी जोडली आहे. झगिति-एकदम-शब्दार्थांचा साक्षात्कार करणें, डोळ्यांपुढें दिपवून टाकणारें सगुण सौंदर्याचें ध्यान उभें करणें, हें प्रतिभेचें कार्य[५४]. रामदासांच्या समर्थ शब्दांत सांगावयाचें म्हणजे, ही महामाया "उठवी शब्दांकुर। वदे वैखरी अपार। शब्दांचें अभ्यंतर। उकलून दावी॥".[५५] तिची खूण अनुभवानें पटते; तिचीं लक्षणें ओळखतां येतात. "जे प्रत्यक्ष पाहातां आढळे। विचार घेतां तरी नाढळे। जयेचा पार न कळे। ब्रह्मादिकांसि॥"[५६]

तिच्या गुणधर्मांचें मानवी बुद्धीला संपूर्ण आकलन झालें असतें तर कवींच्या शाळा उघडणें शक्य झालें असतें. पण अनुभव असा आहे कीं, शाळा माणसास कदाचित् काव्यविशारद करूं शकतील; पण शारदेचा साक्षात्कार करून

देणारा सद्गुरु सहसा भेटत नाहीं. प्रतिभा ही काय चीज आहे म्हणून कांहीं आधुनिक नास्तिक तिचा उपहास करतात. पण कोणत्याही काळांतील व देशांतील कवि घ्या, प्रतिभा हें देवाचें देणें आहे म्हणून त्यानें मस्तक नम्र केलेलें दिसेल; व "न कळे केव्हां कैशी होते कविच्या मनाप्रती स्फूर्ति," असें आश्चर्यवत् बोलून हात जोडलेले दिसतील. शेलीनें या बाबतींत कविश्रेष्ठांकडे धांव घेतली. मिल्टनला तर प्रतिभा कानांत काव्य सांगत असे. आमच्याकडे "बोलविता धनी वेगळाचि" किंवा "जैसा वाजविणार फुंकितो वारें। तैसीं वाजंत्रें वाजती।" इत्यादि वचनें सर्वांच्या परिचयाचीं आहेत. मी अगदीं आधुनिक अशा दोन इंग्रेजी कवींचा पुरावा देणार आहें. वर उल्लेखिलेले हॉउसमन् साहेब दुपारच्या भोजनानें आणि "बिअर"नें बुद्धि शांत करून शून्यमनानें सृष्टिसौंदर्य न्याहाळीत एकटे सहल करीत असतां एकाएकीं त्यांच्या चित्तांत कवितेचे चरण दत्त म्हणून उभे ठाकत. दुसरे ड्रिंकवॉटर हे आपल्या अपुऱ्या राहिलेल्या इंग्रेजी काव्याच्या इतिहासांत म्हणतात कीं, "प्रतिभेचीं लोकांनीं अवास्तव स्तुतिस्तोत्रें गाइलीं असतील; तथापि प्रतिभेचें अस्तित्व आणि महत्त्व नाकबूल कसें करतां येईल? तिच्या प्रेरणेनें कविमनांत एकदम देदीप्यमान प्रकाश पडतो; ठाव न घेतलेल्या, ठाऊकही नसलेल्या, अगाधांतून शब्द व चित्रें वर येत राहातात; ठराविक परंपरेनें कल्पना सुव्यवस्थित पुढें सरसावतात; आणि स्वेच्छे-शिवाय, केवळ अद्भुत किमयेनें, शब्दांचें सोनें होतें."[५७] सर्व कवींनीं ही एकमतानें दिलेली ग्वाही आम्हांस उपेक्षणीय कां वाटावी? त्यांना असें म्हणण्याचा अधिकार आहे कीं, प्रतिभा हें कवींचें सौभाग्य आहे;—या कुंकवाच्या उठाठेवी इतरांस कशास?

कवींना साहित्याचार्यांचा पूर्ण पाठिंबा आहे. प्रतिभा ही अद्भुत शक्ति आहे, दैवी वर आहे, याविषयीं आमच्या साहित्याचार्यांना कधींच शंका नव्हती. एकट्या वामनाचें मत सांगितलें म्हणजे पुरे.[५८] "कवित्वबीजं प्रतिभानम्। जन्मान्तरागतसंस्कारविशेषः कश्चित्। यस्माद्बीजं विना काव्यं न निष्पद्यते। निष्पन्नं वा हास्यायतनं स्यात्।." प्रतिभेची मर्जी तपस्येनें संपादन करतां येणार नाहीं, टांग्याच्या घोड्याला मालिशादि संस्कार करून उच्चैःश्रवा करतां येईल यासारखीच ती दुःसाध्य भोळसट अपेक्षा होय, अशी त्यांच्या

अंतःकरणाची खात्री होती. तथापि कवित्वाकरितां धडपडणारे उमेदवार हताश होऊं नयेत म्हणून त्यांना गोड थापांनीं त्यांनीं थोडेसें झुलविलें आहे. उदाहरणार्थ दण्डी — "न विद्यते यद्यपि पूर्ववासनागुणानुबन्धि प्रतिभान-मद्‌भुतम्। श्रुतेन यत्नेन च वागुपासिता ध्रुवं करोत्येव कमप्यनुग्रहम्॥"[५९] (जन्मांतरींच्या सुकृतें स्फुरे जी। आंगीं जरी ती प्रतिभा न अद्‌भुत। वाणी श्रुतें यत्नभरें उपासितां। कांहींतरी साच करी अनुग्रह॥). किंवा रुद्रट—"उत्पाद्या (प्रतिभा) तु कथंचिद् व्युत्पत्त्या जन्यते परया।".[६०] या दोघांनीं योजिलेले "कमपि" "कथंचिद्" हेच शब्द, जातीची प्रतिभा नसेल तर केवळ व्युत्पत्तीनें ती अंगीं आणणें किती कष्टाचें आहे हें सुचवितात. व्युत्पत्तींत युक्तायुक्तविवेकाबरोबर जो प्रयत्नाचा भाग आहे तो काव्याचा शेवटचा पण महत्त्वाचा घटक आहे हें मला आतां सांगावयाचें आहेच. प्रतिभेला व्युत्पत्तीची जोड पाहिजे असा आग्रह धरणाऱ्या राजशेखरानेंसुद्धां अभ्यासानें प्रतिभा साध्य होते असें कुठेंच म्हटलें नाहीं. त्या दोघांना तो लावण्यरूपाप्रमाणें लेखितो[६१] आणि रूपलावण्य हें अभ्यासितां नये, सहज गुणांस न चले उपाये, हें प्रसिद्धच आहे. सारांश, सहजा अथवा नैसर्गिकी प्रतिभा हें काव्यसंपदेचें प्रधान साधन होय.

प्रतिभेला जर प्रयत्नाची जोड नसेल तर काव्यसंपदा वाढणार नाहीं. मनांत स्फुरलेली कविता लहान कां असेना, ती पुरी करण्यासाठीं, आणि पुरी झाल्यानंतर घांसून-पुसून उजळ करण्यासाठीं, प्रयत्न केला पाहिजे; त्या अभियोगांत[६२] मंदपणा येतां कामा नये. सारस्वत कवीच्या सेवेस प्रतिभा सदैव सारखीच सिद्ध असते असें नाहीं. हाउसमॅन्[६३] साहेबांची सत्यकथा याही बाबतींत तितकीच मार्गदर्शक आहे. त्यांच्या पहिल्या काव्यसंग्रहांतील शेवटची कविता किती कष्टानें जन्माला आली हें त्यांनीं स्वतः स्पष्ट केलें आहे. दोन श्लोक समग्र त्यांच्या डोक्यांत एकदम अवतरले. दुपारीं चहा पिऊन थोड्याशा आराधनेनंतर तिसरा सुचला. आणखी एक हवा होता. तो कांहीं केल्या येईना. तो रचवावा लागला. त्यांनीं तो तेरा वेळ लिहून शेवटीं बारा महिन्यांनीं पूर्णावस्थेला आणिला! हा काव्यबन्धाचा उद्यम, अभियोग, अंगीं नसल्यानें कित्येक कवींनीं प्रतिभेच्या पहिल्या भरांत सांपडलेले दीप्तिमान् तुकडे तसेच ठेवून दिले आहेत. इंग्रेजींत शेली व मराठींत गडकरी यांना

चिकाटीनें घडणावळीचे कष्ट करण्याची संवयच नव्हती. याच्या उलट, आधुनिक रशियन् कवि मायकोव्हस्की व आमचे मोरोपंत यांचा प्रयत्नावर फार भर. मोरोपंत भिंतीवर यमकें लिहून ठेवीत असत अशी दंतकथा आहे. आणि खिशांत नेहमीं स्मरणवही बाळगून शब्द, कल्पना, कवितांचे चरण यांचीं[६४] सांठा मायकोव्हस्की करून ठेवीत असे. काव्यासाठीं तो दिवसाचे अठरा तास खर्चित असे. लेखणीसहित कागद-दौती वाहणाऱ्या रामदासांना-सुद्धां उदंड कविता करतां आली याचें रहस्यही प्रयत्नच. महाकाव्य किंवा सर्गबन्धाचें काव्य प्रयत्नाशिवाय साध्यच होणार नाहीं. परंतु लहानशा प्रासंगिक काव्यासाठींसुद्धां "वाचमर्थोऽनुधावति" (वाचेमागें अर्थ धांवे जयांच्या) अशी परिणतावस्था प्राप्त होईतोंपर्यंत सारखें खपावें लागतें. गोगलगाईच्या शिंगांप्रमाणें सौंदर्याशीं[६५] अगदीं तरल आणि हळुवार संपर्क साधावयाचा असेल तर शब्दाच्या कुसरकामाचे सतत परिश्रम घ्यावे लागतात. रसाला, प्रचीतीला उचित अशी शब्दांची सूक्ति बांधणें यांतच कलेचा परिपाक दिसतो. कविला वेदांत कारु म्हटलें आहे तें यासाठींच. "पोएट" या शब्दाचा धात्वर्थही तोच आहे.

७

वर मांडलेल्या या प्रपंचांतून निघणारा परमार्थ स्पष्ट करण्याकरितां मी पूर्वी उल्लेखिलेल्या वाल्मीकीच्या आदिकवितेचें आतां उदाहरण घेतों. क्रौंचवधाचें हें भाव-काव्य म्हणजे वरील प्रयोगाचें उत्कृष्ट प्रात्यक्षिक होय. पक्ष्यांची पारध किंवा शिकार पुष्कळांनीं पाहिली असेल व केलीही असेल. त्यांच्या माना अनेकांनीं मुरगळल्या असतील. त्याबद्दल मोठीशी हळहळ न वाटणें हाच बहुतेकांचा मनोधर्म. क्वचित्च एखाद्याचें हृदय अस्वस्थ होतें. माझ्या माहितीचा एक लहान मुलगा होता. त्याच्या घरीं त्याच्या देखत बबर्जीनें एकदां मुर्गीची मान कापली. त्याबरोबर त्या हळव्या निष्पाप मनाला अतिशय विषाद झाला. तो लगेच आईकडे धांवत गेला; व सारखा रडून विचारूं लागला कीं, "आई, कोंबडीनें कांहींही केलें नसतांना, तिचा कांहींसुद्धां अपराध नसतांना, तिचा गळा कां कापला?" त्या बालमनांत परदुःखाची प्रचीति आली खरी; ज्या व्यवस्थेच्या, न्यायाच्या, ऋताच्या कल्पनेवर विश्व

चालतें, त्या कल्पनेची अस्पष्ट जाणीव होती; प्रक्षोभही झाला; पण प्रसाद आणि प्रतिभेच्या अभावीं त्याचा विलाप काव्यरूप पावला नाहीं. जरा पुढें गेल्यास असें दिसेल कीं, "केवढें हें क्रौर्य" ही डोळयांत टिपें आणणारी कविता लिहिण्यापूर्वी रे॰ हरंड टिळकांना तीच प्रचीति आली असावी, तितकीच प्रक्षुब्ध वृत्ति झाली असावी. त्या भावनेचा पहिला आवेग ओसरल्यावर त्यांनीं तिच्याशीं स्वस्थ चित्तानें विलास केलेले दिसतात. पक्षिणीची शेवटची धडपड सुचविणारें अडखळतें वृत्त योजिलें. वात्सल्याचा भाग घालून करुण रसाचा विशेष परिपोष केला; व अखेर निराळया वृत्तांत एक दुःखाचा उसासा टाकला. येथें प्रसाद स्मरणानें, चिंतनानें आलेला दिसतो; व प्रयत्नानें "पदनिवेशाची निष्कम्पता" साधली गेली. महाकवि वाल्मीकीची पायरी याच्या पुढली. "धर्मात्मा" असल्यामुळें सहचर, चारुनिस्स्वन, काममोहित क्रौंचाच्या जोडप्यांतील एकाला, मत्त नराला, डोळयांसमोर मारलेला तडफडतांना पाहून त्याच्या भावनांचा प्रक्षोभ अनावर झाला. हिंसेइतकीच सृष्टीविरुद्ध घडलेल्या घोर पापाची, अधर्माची, प्रचीति आली. म्हणूनच त्यांना तो निषाद असूनसुद्धां "पापनिश्चय," केवळ "वैरनिलय" वाटला. मन किती प्रक्षुब्ध झालें असेल याची कल्पना पुढील वृत्तान्तावरून सहज येते. "मा निषाद–" हा शाप देऊन वाल्मीकि आश्रमांत गेले असतां त्यांस ब्रह्मदेव भेटण्यास आले. साक्षात् लोकपितामह समोर बसले असतांनासुद्धां, त्यांच्याकडे लक्ष न देतां वाल्मीकि क्रौञ्चवधाचेंच चिन्तन करीत राहिले होते. "तद्गतेनैव मनसा वाल्मीकिर्ध्यानमास्थितः। पापात्मना कृतं कष्टं वैरग्रहणबुद्धिना। यस्तादृशं चारुरवं क्रौञ्चं हन्यादकारणात्। शोचन्नेव मुहुः क्रौञ्चीमुपश्लोकमिमं पुनः। जगावन्तर्गतमना भूत्वा शोक-परायणः॥" (चित्त तेथेंच लागोनी वाल्मीकी ध्यानिं रंगले। वैराच्या बुद्धिनें घोर पापात्मा कर्म आचरी। त्या चारुरव क्रौंचाला कां निष्कारण मारिलें। पुनः पुनः करी शोक क्रौंचीसाठींच, तो पुनः। अन्तर्गतमनें गाई श्लोक शोकपरायण॥). प्रक्षोभांतच होणाऱ्या समाधीचें, प्रसादाचें या उताऱ्यांत वर्णन केलें आहे. "शोकार्तेनास्य शकुनेः किमिदं व्याहृतं मया" (शोकावेगांत पक्ष्याच्या गेलों मी काय बोलुन) हा आश्चर्यवत् स्वतःलाच प्रश्न विचारणारे वाल्मीकि, व "मच्छन्दादेव ते ब्रह्मन्प्रवृत्तेयं सरस्वती" (माझ्या छंदेंच हे ब्रह्मन् स्फुरली

त्वत्सरस्वती) असें त्यांस आश्वासन देणारा ब्रह्मदेव, या दोघांनीं प्रतिभेचें अधिष्ठान मान्य केलें. श्लोक एकच असल्यामुळें, आणि वाल्मीकि एरवीं व्युत्पन्न, शब्दसृष्टीचे ईश्वर असल्यामुळें, प्रयत्नाची जरुरीच नव्हती; ती पुढें समग्र रामायण रचण्यांत खात्रीनें भासली असावी. अशा परिस्थितींत जे स्फूर्तीनें सहजोद्गार बाहेर पडले त्यांत शुद्ध सौंदर्याचा साक्षात्कार झाल्याशिवाय कसा राहील ? "मा निषाद–" या श्लोकांत विश्वांतील व्यवस्थेची साक्ष आहे, त्या भावनेला अनुकूल असें शब्दांचें ऋत साधलें आहे. शब्दांची रचनाच मुळीं अशी आहे कीं कवीच्या प्रक्षोभाची आणि समाधीची यथार्थ कल्पना यावी. "मा" हा अगदीं पहिलाच शब्द उच्चारतांच अन्यायाची चीड आवेगानें संचरते. सनातन व्यवस्थेचें उल्लंघन झालें हें "शाश्वतीः समाः" या शब्दांनीं सुचविलें. शब्दांची मांडणी, लय यांत रतिभर देखील फेरफार करतां येणार नाहीं. प्रतिष्ठा, शाश्वतीः, समाः, मिथुन, एक, काममोहित–यांतल्या कोणत्याही शब्दाला प्रतिशब्द सुचवावयाचा प्रयत्न करा, किंवा ते इकडले तिकडे करून बघा–तें जुळणार नाहीं. म्हणूनच वाल्मीकीचा शोक श्लोकत्व पावला असें म्हणण्याचा प्रघात पडला. आणि हा श्लोक "तन्त्रीलयसमन्वित" (तंबोऱ्याशीं लय साधणारा) असून गेय होता.[६७]

## ८

येथवर मी ज्या पद्यप्रकारास "लिरिक्" म्हणतात त्याची आमची प्राचीन परंपरा वर्णिली, तिच्या पंचप्राणांची ओळख करून घेतली, व अशा एका प्राचीनतम सुकवितेची प्रत्यक्ष भेट देखील घेतली. या पद्यप्रकाराचें लक्षण ठरवून व्याख्या देणें आतां सोपें जावें.

प्रथम त्यांत एकाच उद्दाम प्रक्षोभकारी भावनेची प्रचीति पाहिजे. ती अखंड आणि सलग्न राहिल्यामुळें एकात्मता आली पाहिजे. एकात्मता ही प्रचीतिइतकीच रीतीवर–विशिष्ट पदरचनेवर–अवलंबून राहील; कारण रीति हा काव्याचा आत्मा आहे. शब्द हे भावनेची केवळ प्रावरणें नव्हत; शब्दांतच ती मूर्तस्वरूपानें अवतरते. त्या भावनेचा, प्रचीतीचा, जो ताल व लय असेल तो शब्दरचनेंत उमटला पाहिजे. गळा, तंबोरा आणि तबला हे एकनाद झाल्याशिवाय जसें खरें संगीत नाहीं; तद्वत् प्रचीति, शब्द आणि

रीति यांची एकच धून लागल्याशिवाय खरें भावगीत सिद्ध होत नाहीं. आणि त्यांत सहजोद्गारांची जितकी जातिवंत स्फूर्ति तितकी त्याची सिद्धि परिपूर्ण. हे या पद्यप्रकाराचे विशेष असल्यामुळें त्याला एकाच लक्षणानें जखडून टाकणें कठिण. तें कोणत्या क्षणीं कोणतें मायावी रूप धारण करील हें सांगणेंच अशक्य. तें कधीं कमळासारखें सहस्र दळांनीं प्रफुल्लित दिसेल; तर कधीं शिरीषासारखें कोमलांग असेल. त्याला कधीं चांफेकळीचा उग्र वास येईल; तर कधीं कर्णिकारासारखा नुसता वर्णप्रकर्षच असेल. भावनेप्रमाणें त्याच्या नाचाचा ताल सारखा बदलत राहाणार. लहान मुलीचें बागडणें, वाढत्या बालेचा अल्लड धिंगाणा, तरुणीचा उन्माद, प्रौढेचें स्थैर्य—या प्रकारचे सर्व अनुरूप लय भावनेप्रमाणें त्यांत येतील. त्याचें स्वरूप समजून घेण्यासाठीं महाकाव्याशीं त्याची क्षणभर तुलना करूं. तें ओंजळींत घेतलेल्या अर्घ्यासारखें, तर महाकाव्य म्हणजे षोडशोपचारी पूजा. तें हिऱ्याच्या लहानशा चमकेसारखें, तर महाकाव्य म्हणजे नवरत्नांच्या हारांची घडणावळ. तें बेहोष करून टाकणाऱ्या एका क्षणाच्या इष्कासारखें, तर महाकाव्य म्हणजे सबंध आयुष्यभर अवीट सुखाची सर्व अवस्थांत गोडी लावणारें पत्नीचें प्रेम. तें बुलबुलाचें एकाकी गीत, तर महाकाव्य म्हणजे नाना स्वनांनीं भारून टाकलेलें वनश्रीचें संगीत. तें शिंपलींतलें पाणीदार मोतीं, तर महाकाव्य म्हणजे पोवळ्यांच्या बेटाचें कोरीव लेणें. पुष्कळदां मला असें वाटतें, कीं महाकवीच्या कलेचें पाणीदार पोलाद तयार होत असतां वर्तमानाचे आघात बसून असल्या काव्यांच्या रूपानें असंख्य ठिणग्या उडत राहतात. याची व्याख्याच करावयाची असेल तर आपण असें म्हणूं कीं खरें भावगीत म्हणजे "एकाच प्रक्षोभकारी प्रचीतीचें उचित रीतीनें सहजस्फूर्तींत गाइलेलें काव्य."

भावगीत हा अलीकडे रूढ झालेला मराठी शब्द असलें काव्य जेव्हां खरोखर गीत असेल, रागदारीनें गातां येत असेल, तेव्हांच त्याला उद्देशून वापरावा. परंतु अशीं सर्वच काव्यें गीतें नसतात.[६८] अट्टाहासच केल्यास तीं गीतासारखीं म्हणतां येतील कदाचित्. गीत असो वा नसो; या प्रकारच्या सर्व काव्यांस "मुक्तक" हा जुना शब्द मुक्रर करावा अशी माझी शिफारस आहे. त्या शब्दाची परंपरा प्राचीन आहे. एका स्वतंत्र श्लोकाला मुक्तक असें म्हणत असत; मग तो कुठेंही आलेला असो. "मुक्तकमन्येन नालिंगितम्। तेन स्वतंत्रतया परिसमाप्तनिराकांक्षार्थमपि प्रबन्धमध्यवर्ति मुक्तकमित्युच्यते।"

ह्या अभिनवगुप्तानें दिलेल्या व्याख्येचें[६१] रहस्य हेंच कीं, हा पद्यप्रकार स्वतंत्र, परिपूर्ण आणि विविध असूं शकतो. मग मुक्तक हें एकाच श्लोकांत असलें पाहिजे हा आग्रह पाळण्याचें आम्हांस आज प्रयोजन नाहीं. आपण एकाच श्लोकाच्या मुक्तकाला मराठींत कणिका हें अणुतर नांव दिलेंच आहे. मुक्तक हा शब्द योजण्यांत प्रचीतीप्रमाणें मिळालेली शुक्ति, व त्याहीपेक्षां यदृच्छेनें तयार झालेली कृति यांची आगाऊच सूचना होते. व या स्फूर्तिकीटकानें स्वतः-करतां हें साजेसें कलाकुसरीचें आवरण केलें आहे याची आठवण होते. येथें हें सांगणें अप्रस्तुत होणार नाहीं कीं हौंउसमन् साहेब हे काव्याला शिंपल्यांतल्या मोत्यांची याच कारणास्तव उपमा देत असत. हा एक अन्तर्गत निस्यन्दच होय. तेव्हां "लिरिक्" हा परकी शब्द न वापरतां यापुढें अधिक अर्थक्षम असा "मुक्तक" हा शब्द वापरावा. मुक्तकें म्हणजेच प्रासंगिक स्फुट कविता हा संकेत ठरवून टाकावा. आणि त्यांतलें सन्मौक्तिक (-स्वातीच्या सुमुहूर्तावर सागरशुक्तींत पडलेल्या जीवनबिंदूनें तयार झालेलें-) तें भावगीत.

हा निबंध आतां इतका लांबला कीं, मुक्तकांना महाराष्ट्रांत बाजारभाव येण्यास काय केलें पाहिजे, आमचीं अलीकडील मुक्तकें "कल्चर्ड" का वाटतात इत्यादि धंदेवाईक प्रश्नांची चर्चा[६८] माझ्या मुक्तकांची दुसरी ओंजळ भरेतोंवर पुढें ढकलली पाहिजे. दरम्यान् या संग्रहांतील मुक्तकांचें खरें पाणी ओळखून त्यांतील बरेचसे—वाटल्यास सर्व कां म्हणा ना—दाणे टाकाऊ आहेत असें जरी या निबंधाच्या कसोटीवरून वाचकांनीं पारखून ठरविलें, तरी निबंधाचें सार्थक झालें असें मी समजेन!

## टीपा

१. लिरिक्—म्हणजे ' लायर ' या तंतुवाद्याच्या साथीनें गाइलें जाणारें काव्य.

२. ऋग्वेद. १०.९५.

३. " सतो बन्धुमसति निरविन्दन्हृदि प्रतीष्या कवयो मनीषा " ऋग्वेद १०.१२९.४.

४. " कुवित्सोमस्यापामिति " ऋग्वेद. १०.११९.

५. " केवलाघो भवति केवलादी " ऋग्वेद. १०.११७.६.

६. ऋग्वेद. १०.८६.६.

७. ऋग्वेद. १०.३४.

८. " आवेशसमकालं कवते " राजशेखर : काव्यमीमांसा-चौखम्बा पा. ६७.

९. पद्दा–Svayambhūcchandas by Svayambhū. H. D. Velankar, Journal of the B. B. R. A. Society, N. S. Vol. I1 (1935), p. 26.

१०. वरील लेख पा. २४.

११. " सत्त सताइं कइवच्छलेण कोडीअ मज्झआरम्मि। हालेण विरइआइं सालंकाराणँ गाहाणम् " गाथासप्तशती. १.३. पालि वाङ्मयांत अनेक गाथा सांपडतात, व ध्रुवपद असलेलीं गाथांचीं सूक्तेंही आहेत.

१२. " अमिअं पाउअकव्वं पढिउं सोउं अ जे ण आणन्ति। कामस्स तत्ततन्तिं कुणन्ति ते कहँ ण लज्जन्ति "–गाथासप्तशती. १.२.

१३. Apabhramśa and Marāṭhī Metres. H. D. Velankar New Indian Antiquary, Vol. 1. No. 4. p. 215.

१४. Venus, Virtus, Salus.

१५. होनाजी बाळा, पा. १३० ( चित्रशाळा आ० ).

१६ व १७. श्रीसमर्थकृत करुणाष्टकें, भाट्या वगैरे. पा. १० आणि १६.

१८. तुकारामाचा गाथा ( पंडित ) २.७३.

१९ व २०. तुकारामाचा गाथा ( पंडित ) १.७४२,२४६.

२१. सोहिरोबा आंबिये : पहा–पा. १०६, जिवबा दादा बक्षी यांचें चरित्र (राजाध्यक्ष).

२२. Dryden: Introductory Letter to Annus Mirabilis.

२३. Shelley: A Defence of Poetry, in The Four Ages of Poetry, p. 54.

२४. पहा—The Notebooks of Malte Laurids Brigge by Rilke.

२५. "तच्चेतसा स्मरति नूनमबोधपूर्वम्" शाकुन्तल (५·२).

२६. दण्डी-काव्यादर्श १·४५· प्रतीति हा शब्द दण्डीच्या अर्थी मी योजिला नाहीं.

२७. दासबोध ९·५·१५.

२८. Cecil Day Lewis: A Hope for Poetry, p. 55.

२९. Conversations of Goethe with Eckermann, p. 8, 126.

३०. F. L. Lucas: The Criticism of Poetry–Proceedings of the British Academy Vol. XIX. 1933. पहा– Virginia Woolf: A Letter to a Young Poet, pp. 17–19.

३१. पहा – Randall Swingler: History and the Poet. New Writing, New Series 3.

३२. राजशेखर : काव्यमीमांसा. पा. ४७·४८.

३३. Modern Poetry, p. 198.

३४. A Hope for Poetry, p. 75.

३५. राजशेखर : काव्यमीमांसा पा. ५५.

३६. ऋग्वेद. १०·१७३·४.

३७. राजशेखर: काव्यमीमांसा पा.१४६.पहा– Drinkwater, Lyric पा. २२.

३८. पहा–Squire: Essays on Poetry, pp. 14 to 47, आणि विशेषतः पा. ३८—"This day relenting God
Hath put within my hand
A wondrous thing."

३९. कुसुमाग्रज : विशाखा पा. ४२.

४०. Eliot : Sacred Wood, p. 58; John Drinkwater: An Unfinished History of English Poetry, p. 46.

४१. Shelley : A Defence of Poetry, p. 30.

४२. या विषयावर पहा- Samuel Alexander : Philosophical and Literary Pieces या ग्रंथांतील कलेवरील तीन निबंध ; आणि Poetry and Contemplation by Hamilton, p. 69. Eliot : The Use of Poetry and the Use of Criticism, p. 108.

४३. Housman: The Name and Nature of Poetry, pp. 46–47.

४४. Croce: The Defence of Poetry, p. 24.

४५. वामनः काव्यालंकारसूत्राणि १·३·८.

४६. भगवद्गीता. २·६५.

४७. Croce: The Defence of Poetry, p. 24.

४८. भर्तृहरिः वै. ६७.

४९. राजशेखरः काव्यमीमांसा पा. ४२. इंग्रेजींत समाधीला transport किंवा poise म्हणतां येईल.

५०. पहा–वामनराव जोशी : वाङ्मयीन महात्मता–प्रस्तावना पा. १०.

५१. माझा हा स्वतःचा अनुभव आहे. दुसऱ्यांनाही हा अनुभव आलेला आहे. पहा –Eliot: The Use of Poetry and the Use of Criticism, p. 144.

५२. Shelley : A Defence of Poetry, pp. 53–54.

५३. रुद्रटः काव्यालंकार. १·१५.

५४. इंग्रेजींत यालाच vision म्हणतात. Vision, not interpretation, that is poetry. Selincourt On Poetry, Oxford Lectures on Poetry, p. 22.

५५. दासबोधः १·३·२ आणि ७.

५६. Housman: The Name and Nature of Poetry, p. 49.

५७. An Unfinished History of English Poetry, pp. 8, 9.

५८. वामन: काव्यालंकारसूत्राणि १·३·१६.

५९. दण्डी: काव्यादर्श १·१०४.

६०. रुद्रट: काव्यालंकार १·१६+१७.

६१. राजशेखर: काव्यमीमांसा पा. ५७·८.

६२. हे शब्द दण्डीचे. काव्यादर्श १·१०३.

६३. The Name and Nature of Poetry, p. 50.

६४. Elsa Triolet on Mayakovsky, pp. 223–4. New Writing, New Series 3.

६५. उपमा कीट्स्ची; Selincourt नें वर उल्लेखिलेल्या निबंधांत उद्धृत केली आहे. पा. १४.

६६. रामायण. बालकाण्ड २·२८-३०.

६७. पालि वाङ्मयांतील त्रिपिटकांत आढळणाऱ्या एकमेव प्रेमगीताच्या स्वरांनीं वीणेच्या तन्त्रीस्वरांशीं लय साधला असें म्हटलें आहे. पहा : सक्कपञ्ह-सुत्त-दीघनिकाय.

६८. मुक्तक आणि भावगीत यांतील फरक, मुक्तकास संगीताची आवश्यकता, मुक्तकाशीं संबंध असलेले छंदोविषयक प्रश्न, यांची चर्चा पुढें करण्याचा इरादा आहे.

६९. ध्वन्यालोक ( ३·७ ) टीका.

७०. The Name and Nature of Poetry, p. 48.